

*डॉ. सालिम अली*

छायाचित्र : रॉबर्ट प्रव यांच्या सौजन्याने.

आपले सारे आयुष्य पक्ष्यांच्या
रंगभऱ्या सुंदर विश्वावर उधळून देणाऱ्या
ऋषीतुल्य पक्षीतज्ञाची आणि
जागरूक पर्यावरणवाद्याची -
जीवनकथा.

# डॉ. सालिम अली

## वीणा गवाणकर






डॉ. सालिम अली
वीणा गवाणकर

प्रकाशक
दिलीप माजगावकर
राजहंस प्रकाशन
१०२५ सदाशिव पेठ
पुणे - ४११ ०३०
फोन - (०२०) २४४७३४५९
E-mail : rajhans1@pn2.vsnl.net.in

मुद्रक
रोहन एंटरप्रायझेस
१६/२, 'स्वोजस'
सहवास सोसायटी
कर्वेनगर
पुणे - ४११ ०५२

Dr. Salim Ali
Veena Gawankar


'राधा', भास्कर आळी
वसई (पश्चिम) प. रे.
ठाणे - ४०१२०१

अक्षरजुळणी
रेखा ढोले
प्रिंट लिंक
७६९/५, शिवाजीनगर
पुणे - ४११ ००४

मुखपृष्ठ : चारुहास पंडित

आवृत्ती पहिली : १९९०
आवृत्ती सातवी : जुलै २००६

ISBN 81-7434-218-4

**किंमत : ५५ रुपये**

डॉ. सालिम अली



जन्म
(१२ नोव्हे. १८९६)

मृत्यू
(२० जून १९८७)



# मनोगत

डॉ. सालिम अलींवर मी लिहावं अशी इच्छा श्री. दिलीप माजगावकरांनी तीन एक वर्षांपूर्वी व्यक्त केली. डॉ. सालिम अलींचं आत्मचरित्र 'द फॉल ऑफ अ स्पॅरो' नुकतंच वाचलं होतं. आता आणखी त्यांच्यावर वेगळं लिहिण्यासारखं काय बाकी असणार, तेव्हा त्यांच्या आत्मचरित्राचंच भाषांतर करावं या इराद्याने पुन्हा एकदा ते वाचलं आणि त्याच सुमारास – म्हणजे २० जून १९८७ रोजी डॉ. सालिम अलींनी जीवनयात्रा संपवली. त्यांची भेट घेणं, भाषांतरासाठी अनुमती घेणं राहूनच गेलं.

तो विचार तसाच बाजूला ठेवून, एक जिज्ञासा म्हणून त्यांच्या सहवासात आलेल्या, त्यांच्या समवेत वावरलेल्या व्यक्तींना भेटायचं आणि त्यांच्याकडून अधिक काही माहिती मिळते का ते पाहायचं ठरवलं. आणि म्हणून, आयुष्यात प्रथमच बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटीच्या हॉर्नबिल हाऊसमध्ये पाऊल ठेवलं. तिथे त्यांचे अनेक सहकारी भेटले. आपल्या गुरुवर्यांबद्दल बोलायला, ज्येष्ठ सहकाऱ्याबद्दल सांगायला जो तो उत्सुक होता. त्यांच्या तोंडून नवनवीन माहिती, आठवणी ऐकायला मिळाल्यावर विचारांनी एक वेगळीच दिशा घेतली...

BNHS चे मानद सचिव डॉ. नानावटी आणि क्युरेटर श्री. जे. सी. डॅनियल यांनी आठवणी सांगितल्या. डॉ. एस.ए. हुसेन यांनी आपली स्मरणे तर सांगितलीच पण सालिम अलींवरील दोन चित्रफितीही दिल्या. तसंच १९७३-७६ सालाची सालिम अलींच्या हस्ताक्षरातली एक रोजनिशीही वाचायला दिली. डॉ. रॉबर्ट ग्रब, शैलजा ग्रब, श्री. विजयन्, श्री.पी.बी. शेखर यांनीही मुलाखती दिल्या. श्री. विजयकुमार आंबेडकरांनी मुलाखत तर दिलीच पण सालिम अलींशी झालेल्या १९५० सालापासूनच्या पत्रव्यवहाराची फाईलही दिली. इतर संदर्भही दिले. तिथलेच श्री. जे.एस. सेराव १९४६-४७ सालापासून सालिम अलींच्या हाताखाली काम केलेले. सालिम अलींचा सहवास चार दशकं लाभलेले. त्यांची स्मरणशक्ती तीव्र. आत्मचरित्र लिहिताना त्यांची फार मदत झाल्याचा उल्लेख सालिम अलींनी प्रस्तावनेत आवर्जून केला. मला श्री. सेराव यांनी प्रदीर्घ मुलाखत तर दिलीच पण एक महत्त्वाची फाईलही हाताळायला दिली. सालिम अलींचा जुना पत्रव्यवहार त्यांनी गोषवाऱ्याच्या रूपानं टंकलिखित केलाय. त्याची एक प्रत त्यांनी सालिम अलींच्या अनुमतीनं स्वतःकडे ठेवली. त्यांच्या व्याख्यानांचे, लेखांचे कच्चे आराखडे, मसुदे सेरावांनी जाणीवपूर्वक स्वतःकडे जतन केलेत. तो सारा ठेवा त्यांनी मला उपलब्ध करून दिला. आणि ही मोठी पर्वणीच... हे गृहस्थ आपल्या या ठेव्याच्या बाबतीत अत्यंत सावध. सहसा कोणाला तिथवर पोचू देत नाहीत. पण सुदैवाने त्यांचा विश्वास मी संपादन करू शकले.

सध्याचे वाइल्ड लाईफ रिजनल ऑफिसचे डेप्यु. डायरेक्टर श्री. पी. कन्नन् हे सालिम अलींचेच विद्यार्थी. त्यांचीही मुलाखत मिळाली. सालिम अलींच्या सहवासात आलेले, त्यांचे मार्गदर्शन लाभलेले पक्षिमित्र श्री. प्रकाश डी. गोळे, श्री. उल्हास राणे, श्री. मारुती चितमपल्ली, श्री. सी.व्ही. कुलकर्णी, श्री. प्रभाकर सोमण यांच्याकडूनही आठवणी मिळाल्या. श्री. गोळेंकडे त्यांची एक ध्वनिमुद्रित मुलाखतही मिळाली.

हॉर्नबिल हाऊसमध्ये आणखी एक महत्त्वाची व्यक्ती भेटली – शाहिद अली. सालिम अलींच्या भावाचा पणतू. सालिम अलींच्या हाताखालीच त्यांनी एम.एससी. केलं. त्यांच्याकडून अनेक स्मरणं, विशेषतः सालिम अलींच्या शेवटच्या दिवसांविषयी, ऐकायला मिळालं, छायाचित्रंही मिळाली. तसंच, त्यांच्या मध्यस्थीने इतर नातेवाइकांच्याही मुलाखती घेता आल्या. शाहिद अलींची आजी ही सालिम अलींची पुतणी. या पुतणीच्या घरी – म्हणजे श्री. व सौ. अदनान फतेहअलींकडेच सालिम अली आयुष्याच्या अखेरीचा महिना-दीड महिना होते. श्री. अदनान फतेहअली हे सालिम अलींच्याच वयाचे. बालपणी एकत्र वाढलेले. त्यांच्याकडून गतकाळातील काही आठवणी ऐकायला मिळाल्या. सालिम अलींच्या बहिणीचे पुत्र श्री. साद अली यांनी वृत्तपत्रीय कात्रणांचा मोठा गठ्ठाच झेरॉक्स करून पाठवला. सालिम अलींच्या थोरल्या बंधूंचे पुत्र श्री. अमीर अली देवनारला राहतात. सालिमसाहेबांच्या मामांची ती जागा. पूर्वी तिथे वनराई होती, त्यांचा जुना कौलारू बंगला होता. त्या ठिकाणी जाबिरभाईंनी बंगला बांधला. आता त्यांचे पुत्र अमीर अली तिथे असतात. त्यांनीही स्मरणे दिली. वृत्तपत्रीय कात्रणे दिली. प्रसिद्ध पक्षिवेत्ते श्री. हुमायून अब्दुलअली हे सालिम अलींचे भाचे. १९३० सालापासून सालिम अलींच्या समवेत सर्वेक्षण मोहिमांत भाग घेतलेले. त्या काळातल्या मोहिमांवर, परिस्थितीवर त्यांनी प्रकाश टाकला, परंतु सालिम अलींविषयी मात्र ते फारसे बोलले नाहीत. सालिम अलींच्या वडील बंधूंची कन्या

झिनत फतेहअली यांनीही मुलाखत दिली. या सर्व मुलाखतींतून सालिम अलींच्या स्वभावातले अनेक पैलू उलगडले. BNHS च्या ग्रंथालयाचाही मला फार मोठा उपयोग झाला. सालिम अलींची सर्व पुस्तके, लेख, संपादकीये मला वाचायला मिळाली. जुनी जर्नल्स, 'हॉर्नबिल' चे अंक पाहायला मिळाले. याच संग्रहालयात सालिम अलींचे परममित्र लोक वान थो यांच्या अप्रकाशित रोजनिशा जतन केलेल्या आहेत. त्याही ग्रंथपाल श्री. किहिमकर यांच्या सौजन्यामुळे वाचायला मिळाल्या. श्री. चतुर्वेदींनी वेळोवेळी सहकार्य दिलं.

श्री. प्रभाकर पेंढारकर, डायरेक्टर, फिल्म्स डिव्हिजन यांच्या सौजन्यामुळे त्यांच्याच स्टुडिओत बसून 'इन कंपनी ऑफ बर्डस्' ही सालिम अलींवरची फिल्म पाहायला मिळाली. छायाचित्रंही लाभली.

ही जमवाजमव, जुळवाजुळव चालू असतानाच मी वृत्तपत्रातून आवाहन करून सालिम अलींविषयक आठवणी, साहित्य मागवले. त्याला पहिलाच प्रतिसाद आला तो श्री. पु.ल. देशपांडे यांचा. आनंदबझार पत्रिकेचे श्री. सलील घोष यांचा लेख त्यांनी साशीर्वाद धाडला. श्री. घोषांना आवर्जून भेटले. त्यांनीही स्मरणं, छायाचित्रं दिली. श्री. राईलकर, श्री. प्रवीण काटवी, श्री. आर.एम. राहूरकर, श्री. मुकुंद डोळे, श्री. एकनाथ पाटील, दादाभाई नवरोजी ट्रस्ट यांनीही वृत्तपत्रीय कात्रणं, लेखांच्या झेरॉक्स प्रती पाठवल्या, तर श्री. सुरेश कुमठेकर यांनी आठवणी पाठवल्या.

एका सार्वजनिक समारंभात ॲडमिरल मनोहर आवटी यांच्या भेटीचा योग आला. त्यांचा सालिम अलींशी घनिष्ठ परिचय असल्याचे माहीत होते. मी त्यांची भेट मागितली. कोणतेही आढेवेढे न घेता त्यांनी ती दिली. यॉट क्लबवर तासदीड तास त्यांच्या तोंडून सालिम अलींविषयी ऐकत होते.

वृत्तपत्रीय कात्रणांसाठी टाइम्स ऑफ इंडियाचे समृद्ध ग्रंथालय उपकारक ठरले. तिथले ग्रंथपाल श्री. जयकर यांनी खूपच सहकार्य दिलं. मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय (नायगाव) येथे मराठी मासिकं, वृत्तपत्रे यांतले लेख वाचायला मिळाले. दोन एक वर्षं हा शोध चालू होता.

सालिम अलींचे पूर्वसूरी म्हणजे इंग्रज अमदानीतले ब्रिटिश अधिकारी. इंग्लंडहून येताना पक्षिप्रेमाचा, पक्षि-अभ्यासाचा वसा घेऊन आलेले. जेर्डोन, ॲलन ॲक्टोव्हियन ह्यूम, ब्लँडफोर्ड, ओटस्, टाईसहर्स्ट, ह्यू व्हिस्लर, इंग्लिस, स्टुअर्टबेकर... सरकारी नोकरी सांभाळत सांभाळत त्यांनी पक्षिप्रेम जपलं. भारतातील आपापल्या अधिकार क्षेत्रातल्या भूप्रदेशांचं पक्षि सर्वेक्षण केलं. पक्षि जाती नोंदवल्या. वर्गीकरण, सूचीकरण



केलं... पण या उपक्रमात सलगता नव्हती. व्यापकता नव्हती. संपूर्ण भारतीय भूप्रदेशाचं असं सर्वेक्षण झालं नव्हतं. आणि जी काही पक्षिसर्वेक्षणं पार पडली होती त्यांतही अनेक त्रुटी होत्या. काही भूप्रदेश तर पक्षि सर्वेक्षणदृष्ट्या उपेक्षितच होते. त्यामुळे संपूर्ण भारतीय भूप्रदेशाचे पक्षिसर्वेक्षण होऊन भारतातील सर्व पक्षिजातींचे सूचीकरण, वर्गीकरण झाल्याखेरीज भारतीय पक्षिविज्ञानाची भक्कम पायाभरणी होणार नव्हती. ही पायाभरणी करण्याची जबाबदारी आपलीच आहे असं मानून त्यासाठी सर्वार्थाने वाहून घ्यायचं असा निर्णय ज्या क्षणी सालिम अलींनी घेतला तो क्षण भारतीय पक्षिविज्ञानाच्या आणि निसर्ग-संरक्षण-चळवळीच्या दृष्टीने सुवर्ण-रेखांकित ठरला.

१९१८ ते १९४३ हा कालखंड भारतीय पक्षीविज्ञानाच्या इतिहासात 'टाईसहर्स्ट-व्हिस्लर-पर्व' म्हणून ओळखला जातो. ह्या खंद्या ब्रिटिश अभ्यासकांनी ह्या कालखंडात भारतीय पक्षिविज्ञानात मोलाची भर टाकली. १९४१ साली टाईसहर्स्ट वारले आणि १९४३ साली ह्यू व्हिस्लर यांच्या निधनानंतर आपलं दुःख व्यक्त करताना सालिम अलींचे गुरू प्रा. इरविन स्ट्रेसमन यांना पाठवलेल्या पत्रात (८-११-१९४३) म्हणतात– 'आता हा अभ्यास, हा वारसा पुढे कोण चालवील याचं उत्तर एकच - सालिम अली!'

गुरूचा आपल्यावरचा विश्वास सालिम अलींनी सिद्ध केला.

सालिम अलींच्या पक्षि-अभ्यासाने त्यांना जागतिक स्तरावरचे शास्त्रज्ञ म्हणून मान्यता मिळाली, हे जेवढे भारताला भूषणावह आहे त्याहूनही काकणभर अधिक सरस आहे ती त्यांची भारताला मिळालेली निसर्ग-संरक्षण आणि सुस्थापन चळवळीची देणगी. पर्यावरणाची जाणीव... पक्षि प्रेमात पडून पक्षीनिरीक्षण करता करता त्यांची निसर्ग अभ्यासाच्या दिशेनेही वाटचाल सुरू झाली... त्यातूनच निसर्गसंरक्षण चळवळ जन्मली. माणूस आणि निसर्ग यांत सुसंवाद निर्माण करण्यासाठी आणि तो राखण्यासाठी ते शेवटपर्यंत क्रियाशील होते.

सालिम अलींच्या ज्ञानाचा मोठेपणा हा की ते ज्ञान हस्तिदंती मनोऱ्यातलं नव्हतं. त्या ज्ञानाला कृतिशीलतेची जोड होती. ही पृथ्वी, तिच्यावरचं पर्यावरण सजीवांना जगण्यालायक राखण्यासाठी लोकजागृती झाली पाहिजे याचं भान त्यांना होतं आणि त्यासाठी ते प्रयत्नशीलही होते. अगदी शेवटच्या क्षणापर्यंत.

पक्ष्यांवर प्रेम करताना, भारत हा शेतीप्रधान देश आहे याचा विसरही त्यांना कधी पडला नाही. जंगले आणि शेती यांच्यासंबंधात पक्ष्यांच्या वर्तनाचा अभ्यास करताना,

मानवी जीवनात पक्ष्यांचे अर्थशास्त्रीय दृष्ट्या स्थान ठरवताना सजीव साखळीतील एक घटक म्हणूनच पक्ष्यांचा त्यांनी विचार केलाय.

शेतकऱ्याचे, शेतीचे खरे शत्रू आहेत कीटक. पक्षी नव्हेत. कीटकांच्या तीस हजार जाती आहेत. वनस्पतीचा प्रत्येक अवयव त्यांचे भक्ष्य आहे. पक्षी कीटकांचे भक्षक आहेत. बाल्यावस्थेत तर पक्षी केवळ महासंहारक मृदुकाय कीटकांवरच जगत असतात. तेव्हा जंगल आणि शेती वाचवायची असेल तर पक्षी जगलेच पाहिजेत असं त्याचं स्पष्ट सांगणं होतं. पशुपक्ष्यांकडे बघण्याचा पक्ष्यांविषयीचा त्यांचा दृष्टिकोन हा भाबड्या भूतदयेचा नव्हता. निसर्गातील, सजीव साखळीतील महत्त्वाचे नि अटळ घटक म्हणून होता.

त्यांच्या अभ्यासाचं विशेषत्व जाणवतं ते आणखी एका बाबतीत. ज्या अभ्यासाला सामाजिक प्रतिष्ठेची बैठक नाही, लौकिकदृष्ट्या चाकोरी बाहेरचा आहे, अशा अभ्यासाचा त्यांनी ध्यास घेतला... आणि हा अभ्यास हेच त्यांचं कार्य ठरलं. त्यांचा अभ्यास अन् त्यांचं कार्यक्षेत्र मिळूनच त्यांचं आयुष्य बनलं होतं. किंबहुना वेगळं, खाजगी असं त्यांना आयुष्य नव्हतंच... सलग साठ वर्षं ते एकाच अभ्यासापाठी राहिले. सुरुवातीच्या काळात तर ते अगदीच एकटे होते. पण त्याची त्यांना पर्वा नव्हती... त्यांच्या अभ्यासाची जाणीव समकालीन जाणकारांना होऊ लागली. पक्षिशास्त्रात नाव होऊ लागलं. सहकारी वाढले... कार्याची व्याप्ती वाढली... ख्यातीही वाढली... मानमरातब मिळाले... तरीही सालिम अली सालिम अलीच राहिले. काहीसे अलिप्त... आर्थिक जगापासून दूर, मानसन्मानाच्या गुंत्यातून निसटून अलगद उडून उंच फांदीवर... संशोधनव्यग्र! ... हाती घेतलेल्या कार्यात एकाग्र... एकनिष्ठ... अविचल. पूर्णत्वाच्या दिशेने चालू असलेली त्यांची वाटचाल कधीच खुंटली नाही की चाकोरीत अडकली नाही... धिम्या गतीनं पण खंबीरपणे ते पुढे पुढे जातच राहिले. 'उद्याचं काय' विचार करायला उसंत नव्हती. 'काल काय पादाक्रांत करून आलो' याचा सुखद अनुभव घेत सैलावण्याची मानसिक गरज नव्हती. बांधिलकी होती फक्त वर्तमानाशी. निवृत्तीचे वेध तर त्यांना कधी लागलेच नाहीत.

आयुष्यभर एकाच गोष्टीचा ध्यास घेऊन त्यासाठी शेवटच्या श्वासापर्यंत धडपडत राहणाऱ्या दुर्मिळ ज्ञानपिपासू मानवजातीतला अखेरचा हा नमुना... अस्तंगत पावत चाललीय ही जात.

एखादी पक्षिजात नामशेष होण्याची कारणं पर्यावरणाच्या बिघाडात सापडतात. दुर्मिळ होत चाललेल्या ज्ञानमहर्षींच्या बाबतीतही तेच लागू पडतं. एखाद्या ध्यासापाठी



एकांडेपणाने वाटचाल करणाऱ्या संशोधकांसाठी समाजातही संवेदनक्षम वातावरण असावं लागतं. समाजमन टीपकागदासारखं असावं लागतं. मगच तो संशोधक मानवी जीवनात सर्वांगांनी शोषला जातो. सात्म होतो. पुतळा बनून. अलग राहत नाही. सालिम अलींचं थोरपण हेच – आपलं कार्यक्षेत्र घडवलं. समाजमन त्यासाठी अनुकूल बनवलं अन् आपलं कार्य, आपलं संशोधन झिरपू दिलं... आणि हे सारं करत असताना ते कोणाच्या सहकार्यासाठी खोळंबले नाहीत की श्रेयासाठी अडखळले नाहीत. अदम्य चाल होती ती.

त्यांची जिद्द, तळमळ, कार्यावरची निष्ठा, दूरदर्शित्व जाणवल्यावर मन थक्क झालं. वाटलं, सालिम अलींपासून प्रेरणा घेऊन त्यांच्या पावलावर पाऊल टाकून वाटचाल करणाऱ्यांची संख्या वाढली तरच खऱ्या अर्थी सालिम अलींचे विचार या भूमीत रुजले, अंकुरले, फुलले, फळले असे म्हणता येईल. तसं झालं नाही तर मात्र 'सालिम अलींचे विचार' परदेशातून आयात करून नव्यानं समजावून घ्यावे लागतील अन् तोवर फार फार उशीर झालेला असेल...

गेली दोन अडीच वर्षं सालिम अलींभोवती वावरत असताना त्यांच्या कार्याचा, विचारांचा नि व्यक्तित्वाचा जो ठसा मनात उमटला त्याला शब्दबद्ध करण्याचा प्रयत्न मी केलाय. माझ्या या प्रयत्नात वर उल्लेखिलेल्यांचा सहभाग फार मोठा आहे.

ह्या पुस्तकाचं हस्तलिखित तयार करत असताना वेळोवेळी त्यात बदल होत गेले. ते पुन्हा पुन्हा वाचून चर्चा करून गाडी रुळावर ठेवावी लागली. या कामी प्रा. सोमण, प्रा. अनंत भावे, प्रा. मणेरीकर यांनी मोलाचं सहकार्य दिलं. प्रा. सोमणांचे तर विशेष आभार मानले पाहिजेत. वेळोवेळी हस्तलिखित वाचून त्यातील शास्त्रीय माहिती आणि विधाने निर्दोष राहतील याची काळजी त्यांनी घेतली. त्यांच्या या विशेष मार्गदर्शनाची मी ऋणी आहे.

या सर्वांचेच हार्दिक आभार.

वसई

**वीणा गवाणकर**



# अनुक्रम





# पाऊलखुणा

किहिममधल्या जुन्या कौलारू मुराद-मंझिलमध्ये डॉ. सालिम अली, त्यांची सचिव अर्चना मेहरोत्रा आणि एक वार्ताहर यांची दिवसभर चर्चा चालू होती. दूरदर्शनवरील एका प्रायोजित मालिकेसाठी डॉ. सालिम अलींच्या जीवनावर चित्रीकरण व्हायचे होते. त्यासाठी त्या वार्ताहराने पटकथा वगैरे पूर्वतयारीही केली. चित्रीकरण कसे, कुठे, केव्हा व्हावे यासंबंधी त्याने डॉ. सालिम अलींशी चर्चा करून आखणी केली. स्थल-काल-स्थिति निश्चित करून निश्चिंत होत्साता वार्ताहर मुंबईला परतला.

ठरल्या तिथीला कॅमेरामन, लाइटमन आदींच्या काफिल्यासह वार्ताहर चित्रीकरणासाठी किहिमला कूच करणार तेवढ्यात अर्चना मेहरोत्राचा फोन आला... सालिमसाहेबांचा एक अनोखा मित्र 'जेर्डोनचा कोर्सर' बऱ्याच वर्षांनी दर्शन देतोय म्हटल्यावर महाशयांनी त्या दिशेला उड्डाण केलंय. त्याच्या दर्शनासाठी ते तातडीने आकाशमार्गे मद्रासला आणि तिथून पुढे खुष्कीच्या मार्गाने लंकामलाई पर्वतराजीच्या पायथ्याशी रवाना झालेत...

दुसऱ्या दिवशी म्हणजे १२ जाने. १९८६ रोजी 'जेर्डोनचा कोर्सर' हातात घेतलेल्या डॉ. सालिम अलींचे छायाचित्र सर्व भारतीय वृत्तपत्रांतून पहिल्या पानावर झळकले.



पंचाऐशी वर्षांच्या कालावधीनंतर प्रथमच या पक्ष्याचा आढळ झाला होता. ही पक्षिजात नामशेष झाली की काय या शंकेने गेली पन्नास वर्षं ते त्याच्या शोधात होते... अनेकदा शोध-मोहिमा काढल्या... पण त्याचा पत्ता लागला नव्हता.

दोनच वर्षांपूर्वी सालिमसाहेबांनी नव्वदीत पदार्पण केलं होतं... आयुष्याच्या अखेरीस का होईना त्यांना याची देही याची डोळा कोर्सर पाहायला मिळाला... त्यांच्या सुरकुतल्या चेहऱ्यावर समाधान फुललं...

त्यांच्यातल्या त्या चिमण्या पक्ष्यानं सुरेल लकेर घेतली.

गेली आठ दशकं ते पक्ष्यांचा मागोवा घेत आले होते... ऐंशी वर्षांपूर्वी सुरू झालेली पक्षि – यात्रा अथकपणे आजही चालूच होती...

तेच कुतूहल.

तोच उत्साह.

तीच ओढ.

वयाच्या दहाव्या वर्षी पीतकंठी चिमण्यानं त्यांच्या मनात घरटं बांधलं.

तो पक्षी आजही तिथंच रुंजी घालत होता. त्याच्या मधुर किलबिलीनं, सुरेल लकेरीनं त्यांची पक्षियात्रा सुरू झाली. ती एक आनंदयात्राच होती!

सालिमचं बालपण गेलं मुंबईच्या गिरगावातल्या खेतवाडीत. अमीरुद्दीन तय्यबजींच्या घरात. सालिम तीन वर्षांचा होण्यापूर्वीच आपल्या मातापित्यांना अंतरला. सालिम नऊ भावंडांत सर्वांत धाकटा. मामा अमीरुद्दीननीच या अनाथ भावंडांचा पोटच्या पोरांप्रमाणे प्रतिपाळ केला.

हे मामा पट्टीचे शिकारी. राजेरजवाडे, संस्थानिक, नबाब यांच्या जोडीनं त्यांच्या शिकारी चालायच्या. मामांच्या घरात शिकारीची नाना हत्यारं. अनेक बंदुका. सालिमची मोठी भावंडं पेन्सिलीइतक्या सहजतेने बंदुकाही चालवायची. लीलया शिकारी खेळायची.

मामांनी सालिमलाही त्याच्या दहाव्या वाढदिवशी डेझी शॉट रिपीटर बंदूक भेट दिली. सालिमचा आदर्श म्हणजे अमीरुद्दीन मामा. त्यांच्याप्रमाणे आपणही पट्टीचे नि ख्यातकीर्त शिकारी व्हावं ही त्याची महत्त्वाकांक्षा. तेव्हा बंदूक हाती येताच त्याने सरावाला सुरुवात केली.

पहिलं लक्ष्य चिमण्या.

मामांच्या बंगल्याला लागूनच त्यांचा तबेला होता. त्यात त्यांची घोडागाडी असे. घोड्याच्या तोबऱ्यातून पडलेले दाणे खायला नि भरपूर वळचणी राहायला असल्याने





चिमण्यांचा मुक्काम तिथे कायमचाच. त्यामुळे सालिमची सरावाची उत्तम सोय झाली. लवकरच तो नेमबाजीत तरबेज झाला.

नेहमीप्रमाणे तो एकदा चिमण्या टिपायला तबेल्यात गेला. त्याची नजर चिमण्यांना हेरू लागली. समोरच्या भिंतीवरची एक खुंटी निखळली होती नि त्या खळग्यात चिमणीनं घरटं बांधलं होतं. खळग्याच्या तोंडाशी एका खिळ्यावर एक चिमणा पहारा देत होता.

तबेल्यात घोडागाडी सोडून ठेवलेली होती. तिच्या आड बसून सालिमने त्या चिमण्याचा वेध घेतला. चिमणा खाली पडला. आता पुढं काय होतं ते पाहण्यासाठी सालिम तिथेच दबून बसला.

दुसरा चिमणा आला नि त्या खिळ्यावर बसून घरट्यावर पहारा देऊ लागला.

सालिमने त्यालाही टिपला.

थोड्या वेळानं तिसरा आला...

...'पुढच्या सात दिवसांत मी एकूण आठ चिमणे टिपले... प्रत्येक वेळी खिळ्यावरची जागा रिकामी न राहता तिथे नवा चिमणा बसे आणि घरट्यावर पहारा देई...' सालिमने आपल्या वहीत नोंदवलं.

या बालशिकाऱ्याच्या मनात तेव्हापासूनच पक्षि-जीवनाविषयीचं कुतूहल फडफडू लागलं होतं.

मामांच्या घरचं वळण अत्यंत धार्मिक. घरातल्या सर्वांनाच धार्मिक नीतिनियम, उसूल काटेकोरपणे पाळावे लागत. चिमणी खाद्य म्हणून धर्मसंमत असली तरी 'हलाल' झाल्याखेरीज तिने डेगचीत शिजायला पडायचं नाही की पुलाव्याची रंगत वाढवायची नाही. नन्नू स्वयंपाकी सालिमने टिपलेल्या चिमण्यांचा हलाल करून त्याला पापशंकेपासून मुक्त करी. या नन्नू स्वयंपाक्याने मीठ-मसाला वापरून चिमण्यांची सागुती कशी करावी याची दीक्षाही त्याला दिली होती.

त्या दिवशी असंच झालं.

सालिमने काही चिमण्या मारून नन्नू स्वयंपाक्याच्या हवाली केल्या. नन्नू हलाल करून एकेकीला धर्मसंमत खाद्यपदार्थांत वर्ग करत होता. समोरच बसून सालिम तो विधी पाहत होता. अन् एकाएकी त्यानं नन्नूला अडवलं... त्याच्या हातातली ती चिमणी इतर चिमण्यांपेक्षा थोडी वेगळीच होती. तिच्या गळ्यावर पिवळा ठिपका होता. ही वेगळी चिमणी भक्षणीय आहे की नाही याची खातरजमा करून घ्यावी म्हणून ती घेऊन सालिम मामांच्याकडे निघाला. आता त्यांनीच मान्यता दिली म्हणजे मग बरं!

मामांनी ती चिमणी उलटसुलट करून पाहिली. बारकाईनं निरखलं. त्यांनाही तिचं वेगळेपण जाणवलं. त्यांनी मग बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटीचे क्युरेटर मिलार्ड



यांच्या नावे चिठ्ठी लिहिली. ती चिमणी नि ती चिठ्ठी घेऊन सालिमला त्यांना भेटायला सांगितलं. तेच तिची जातकुळी सांगतील, म्हणाले.

त्या वेळी बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटी ही फोर्ट विभागातल्या फिप्सन कंपनीच्या इमारतीत होती. १८८३ साली तिची स्थापना झाली अन् तेव्हापासूनच अमीरुद्दीनमामा तिचे सदस्य होते.

१९०६-७ सालातली ही घटना. त्या वेळी हिंदी नेटिवांचा गोऱ्या साहेबांशी सहजासहजी संबंध नसे. त्यात पुन्हा फोर्ट म्हणजे मुंबईतलं इंग्लंड.

सालिम होता अवघा दहा-अकरा वर्षांचा. आजवर त्याचा गोऱ्या साहेबाशी संबंध आला होता तो वर्षातून एकदा शाळा तपासणीसाठी येणाऱ्या दिपोटीसाहेबापुरताच.

दबकत दबकत, धास्तावलेल्या मनानं सालिम सोसायटीच्या इमारतीपाशी गेला. प्रवेशद्वाराशी त्याचं स्वागत केलं ते गणवेशधारी शिपायानं. त्याचं नाव, गाव विचारून, त्याच्या हातातली चिठ्ठी घेऊन शिपाई आत मिलार्डसाहेबांच्या केबिनमध्ये गेला. तोवर सालिम दारात उभा. त्याची नजर आतल्या भिंतीवरून फिरत होती.

भिंतीवर जंगली श्वापदांची मुंडकी हारीनं लावून ठेवलेली. काचेच्या कपाटांतून शंख, शिंपले, पक्ष्यांची अंडी नीट बंदिस्त केलेली... त्याची नजर नवलाईनं सारं टिपत होती... शिपाई आतून बाहेर आला. सालिमला घेऊन मिलार्डसाहेबापुढे हजर केलं. त्यांनी त्याच्या हातातलं पुडकं उघडून पाहिलं. पक्षी उलटसुलट करून पाहिला नि म्हणाले – "अरे, हा तर पीतकंठी चिमणा!"

त्या दिवशी मिलार्डनी त्याला अलीबाबाच्या गुहेतून फिरवलं. पक्षिसृष्टीचं दार उघडून दिलं. अनेक जातींच्या चिमण्या, नाना पक्षि नमुने, चित्रं, छायाचित्रं, अंडी... साहेब खणामागून खण उघडत दाखवत होते... मुख्य म्हणजे ते सारे होते भारतीय पक्षी... विस्फारल्या नजरेनं सालिम सारं पाहत होता. अधिऱ्या कानानं ऐकत होता... मन थुईथुई नाचत होतं...

मग मिलार्डनी त्याला दोन पुस्तकं दिली वाचायला – 'कॉमन बर्डस् ऑफ बॉम्बे' आणि 'अ नॅचरॅलिस्ट ऑन प्राऊल.' या पुस्तकांनी सालिमची उत्सुकता तर वाढवलीच; पण पट्टीचे शिकारी होण्याबरोबरच पक्षिशास्त्रज्ञ होण्याची इच्छा त्याच्या मनात मूळ धरू लागली.

सोसायटीतल्या त्याच्या खेपा वाढल्या. लवकरच त्याने पक्षि-नमुने तयार करण्याची कला हस्तगत केली. पक्ष्यांची कातडी पिसांसकट उतरवायची (स्किनिंग), त्या कातडीत कापूस भरून पक्षी-नमुना तयार करायचा, त्याला लेबल लावायचं इत्यादी तांत्रिक बाबी त्याने समजून घेऊन आत्मसात केल्या. मिलार्ड त्याला म्हणाले – 'पक्ष्यांविषयी तुला खूप काही जाणून घ्यायचं असेल तर त्यांचा नमुना संग्रह करायला नि त्यांच्याविषयीची





**छोटा सालिम**
(छायाचित्र : फिल्म्स् डिव्हिजनच्या सौजन्याने)

**'चबुतरा' – अमिरुद्दीनमामांचा देवनारमधील बंगला. (१९२५)**
(छायाचित्र : अमीर अलींच्या सौजन्याने)





**तेहमिना - सालिम – १९ आक्टो. १९२८**
(छायाचित्र : अमीर अली, देवनार, यांच्या सौजन्याने)



**भगिनी आणि भाची समवेत किहिममध्ये (१९३०)**
(छायाचित्र : अमीर अली, देवनार, यांच्या सौजन्याने)



**देवनारमध्ये अंबापार्टीत रंगलेले**
(छायाचित्र : अमीर अली, देवनार, यांच्या सौजन्याने)



**लपणात सालिम अली**
(छायाचित्र : फिल्म्स् डिव्हिजनच्या सौजन्याने)



**पक्षिनिरीक्षणासाठी निघालेले सुसज्ज सालिम अली**
(छायाचित्र : फिल्म्स् डिव्हिजनच्या सौजन्याने)



**किहिममधील सालिम अलींचे निवासस्थान**

(छायाचित्र : श्री. सालील घोष, (अमृतबझार पत्रिका) यांच्या सौजन्याने)



**वृद्ध सालिम अली, १९८६**

(छायाचित्र : श्री. सालील घोष, (अमृतबझार पत्रिका) यांच्या सौजन्याने)

निरीक्षणं नोंदवायला शिकलं पाहिजे.'

सालिम पक्ष्यांच्या मागावर निघाला. त्यांच्या जीवनाविषयी जाणून घ्यायला तो विलक्षण उत्सुक झाला. जमेल तशी, जमेल तिथून माहिती जमवू लागला. नोंदी ठेवू लागला.

त्या चिमणपारधीनं त्याला एका वेगळ्याच विश्वात नेलं. त्याच्या वाचनातही आता निसर्ग-इतिहास आणि खास करून पक्षि-जगत् हे विषय येऊ लागले.

शालेय जीवनात सालिम फारसा कुठे चमकला नाही. गणिताबाबत तर चिंताजनकच परिस्थिती होती. चौथ्या यत्तेत असताना मात्र उत्तम वर्तनाबद्दलचं पारितोषिक म्हणून एक पुस्तक मिळालं होतं. – 'अवर ॲनिमल फ्रेन्डस्.'

खेळात त्याला गती नि गोडी. हॉकी, फूटबॉल, टेनिस, बॅडमिन्टन हे तर आवडीचेच, पण खास आवड होती ती घोडदौडीची. चौपाटीपासून थेट कुलाब्यापर्यंत समुद्रकिनाऱ्यानं घोडदौड चालायची. शाळेव्यतिरिक्तचा फावला वेळ पक्षी टिपण्यात, पाळलेल्या पक्ष्यांची देखभाल करण्यात नाहीतर घोडदौडीत जायचा.

त्या काळात रुपयाला पंचवीस कवडे नाही तर होले मिळायचे. डालगं भरून जिवंत कवडे, होले, पिलोटे मामांच्या घरी पुलाव्यासाठी यायचे. सालिम त्यांतला एखाददुसरा पक्षी पळवायचा. पाळायचा. तशा त्याच्या संग्रहात खारी, सरडे, पाली होत्याच. झालंच तर अंडी, फुलपाखरंही होती. अभ्यासाचं टेबल त्यांनीच व्यापलेलं असे. मग अभ्यासाला जागा कुठून? आपल्या दिवंगत बहिणीचं हे शेंडेफळ! कशाला बापड्याला दुखवा म्हणून मामाही त्याच्या नादिष्टपणाकडे काणाडोळा करत.

सालिमचं वय वाढत गेलं तसं त्याच्या पट्टीचे शिकारी बनण्याच्या महत्त्वाकांक्षेला धुमारे फुटू लागले. त्याच्या वाचनात आता शिकारकथा, जंगलातील साहसकथा, शोधकथा अधिकाधिक येऊ लागल्या. मामांच्या टपालात रायफली, बंदुका, काडतुसं यांवरची माहितीपत्रकं, सचित्र पुस्तिका असत. शिकारीची स्थळं वर्णन करणारी पत्रकं असत. या वाङ्मयाचा सालिम मन:पूर्वक अभ्यास करी. बारीकसारीक तपशील त्याला मुखोद्गत असायचे. त्याची स्मरणशक्ती बाकी कमालीची तीव्रच.

सालिमचे वडील बंधू हमीदभाई हे सिंधमध्ये सरकारात मोठ्या हुद्द्यावर होते. त्यांनाही शिकारीचा मोठा शौक. त्यांचा निसर्गविषयक अभ्यासही दांडगा. कधीकधी सुट्टी घालवण्यासाठी सालिम त्यांच्याकडे जाई. तिथल्या वास्तवात नव्या पक्ष्या-प्राण्यांची शिकार करी. हमीदभाई सालिमचे कुतूहल शमन करत. नव्या पशुपक्ष्यांचा परिचय करून देत. सांगोपांग माहिती पुरवत.

या साऱ्याचा परिणाम म्हणजे आपण पक्षिशास्त्रज्ञ व्हावं हा विचार सालिमच्या डोक्यात रुजला होताच, तो आता फोफावू लागला.



१९१३ साली सालिम मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाला. कॉलेजमध्ये जाऊन प्राणिशास्त्राची पदवी घ्यावी, पक्षिशास्त्रात पारंगत व्हावं या विचाराने त्याने सेंट झेविअर्स कॉलेजमध्ये प्रवेश परीक्षेचा अर्ज भरला. पण लोगारिथम् आणि त्याच्या अवघड भावंडांनी सालिमची झोप उडवली. ही अडथळ्याची शर्यत पार पाडणं आपल्याला जमणारं नाही असा निर्णय त्याच्या मनाने दिला.

तो या त्रस्तावस्थेत असतानाच त्यातून त्याची सुटका केली ती त्याच्या जाबिरभाईने.

जाबिरभाई सालिमपेक्षा चारपाच वर्षांनी वडील. ते ब्रह्मदेशात खाणधंद्यात होते. इमारतीसाठी आणि खाणकामासाठी लागणाऱ्या सामानाचा, अवजारांचा ते तिथे तेव्हायमध्ये व्यापारही करत. 'कॉलेजात जायचा फारसा हट्ट नसेल तर तेव्हायला माझ्या मदतीसाठी ये' असं त्यांनी पत्राने सालिमला कळवलं.

अडथळ्यांच्या शर्यतीला बगल देऊन सालिम मोठ्या खुशीनं रंगूनला दाखल झाला. पक्षिशास्त्रज्ञ होण्याच्या त्याच्या स्वप्नाला गणितानं टाचणी लावली. आता व्यापाराचं काही गणित साधलं तर पाहावं असं त्यानं ठरवलं. वयाच्या अठराव्या वर्षी तो तेव्हायला गेला.

तेव्हायमध्ये तराजूचा काटा तोलायचे, पुड्या बांधायचे धडे तो घेऊ लागला. दुकान सांभाळणे, हिशेबबिशेब ठेवणे, टंकलेखन वगैरे काम करण्यात त्याचा वेळ जायचा. असं असलं तरी साप्ताहिक सुट्टी मात्र तो भ्रमंतीसाठी राखून ठेवी. जाबिरभाईच्या पांढऱ्या तट्टावर स्वार होऊन तो तेव्हायच्या परिसरात भटके. रबराचे मळे, फळबागा, वनराया पालथ्या घाली. पक्ष्यांच्या मागावर दूरवर जाई.

त्या वेळी सालिमला पक्ष्यांच्या विविध जातींची माहिती नव्हती. त्याच्याकडे दुर्बीणही नव्हती. त्याच्या संग्रही मरेकृत 'बर्डस् ऑफ इंडिया' होतं. पण त्यात पक्ष्यांची चित्रं नव्हती. होती नुसती वर्णनं. त्यामुळे एखादा नवा पक्षी आढळला की त्याची ओळख पटवून घेण्यासाठी सालिमला यातायात करावी लागे. पण त्यातही एक आगळी मजा तो अनुभवी. काळा चाष, बहुरंगी ब्रॉड बिल, सुतार पक्ष्यांचे अनेक भाऊबंद... सालिमचा संग्रह वाढत होता. बॉम्बे नॅ. हि. सोसायटीत वरचेवर पत्र पाठवून तो आपल्या शंकांचं निरसनही करून घ्यायचा. असं होतं तरी १९१४ ते १९१७ या कालावधीत त्याचा पक्षिजीवनविषयक अभ्यास हा फावल्या वेळचा, हौसेखातर केलेला अशाच स्वरूपाचा होता.

१९१७ साली सुट्टी घेऊन सालिम भारतात आला. त्या वेळी त्याच्या संचितात चिंताच अधिक होत्या. कोणत्याही प्रकारचं व्यवसाय-शिक्षण नसताना, आंतरिक ओढही नसताना तो व्यापारउदिमात उतरला होता. आणि त्यापायी उद्भवणारे दुष्परिणामही अटळच होते.





मुंबईत आल्यावर वडीलधाऱ्यांच्या सल्ल्यानुसार फोर्टातल्या दावर कॉलेजात तो कमर्शियल लॉ आणि अकौंटन्सी शिकू लागला खरा; पण त्याची अस्वस्थता, बेचैनी त्याची पाठ सोडायला तयार नव्हती.

त्या वेळी सें. झेविअर्स कॉलेजात जीवशास्त्र विभागाचे प्रमुख होते फा. ब्लॅटर. त्यांच्या अनुमतीने तो तिथे प्राणिशास्त्राचा अभ्यास करू लागला. अर्थात पदवी अभ्यासक्रमाचा नियमित विद्यार्थी म्हणून नव्हे तर अनौपचारिक शिक्षण घेणारा जिज्ञासू म्हणून.

दावर कॉलेज आणि सेंट झेविअर्स कॉलेजात वर्ग उरकल्यावर तो फावल्या वेळात बॉ. नॅ. हि. सोसायटीच्या ग्रंथालयात, संग्रहालयात जाई. या वेळी त्याला भारतीय पक्षिसृष्टीचा सखोल परिचय झाला. ब्रह्मदेशातील भ्रमंतीत ओळखता न आलेले कितीतरी पक्षी त्याला सोसायटीच्या संग्रहालयात आढळले. या संग्रहालयात आणि सोसायटीच्या प्रेटरसाहेबात सालिम चांगलाच रमला. या प्रेटरसाहेबाच्या बरोबरीनं त्याने पक्षिजगतात बरीच मुशाफिरी केली.

सालिमच्या बहिणींनी मात्र एक वेगळाच घाट घातला. त्यांच्या दूरच्या नात्यातली तरुणी तेहमिना लतिफ हिला त्यांनी सालिमसाठी नेमस्त केली.

तेहमिनाचे वडील काही वर्षांपूर्वी मोत्याच्या व्यापारानिमित्त इंग्लंडला स्थायिक झाले होते. तेहमिनाचं शालेय शिक्षण उच्चभ्रू समाजासाठी असलेल्या तिथल्या शाळेत झालं. मॅट्रिक झाल्यावर तिला तिच्या वडिलांनी उच्चभ्रू लोकांच्या चालीरीती, अदब यांचं वळण लावण्यासाठी 'फिनिशिंग स्कूल'मध्ये घातलं.

पहिल्या जागतिक युद्धाच्या असुरिक्षत वातावरणाच्या काळात, १९१५ च्या सुमारास, लतिफ मंडळी भारतात परतली. मुंबईत स्थायिक झाली. त्यामुळे सालिमच्या बहिणीच्या नजरेला तेहमिना आली. तिच्याविषयीची सारी हकीकत त्यांनी पत्रातून सालिमला पूर्वीच कळवली होती. आपला मनोदयही कळवला. पण सालिम मात्र एवढ्यात लग्नासाठी राजी नव्हता.

भारतात आल्यावर बहीण-भावजयांपुढे काही चाललं नाही. त्यांनी युक्ती-प्रयुक्तीने सालिम-तेहमिनाच्या भेटी घडवून आणल्या.

तेहमिनाला आपल्याबरोबर आयुष्य व्यतीत करणं कितपत मानवेल याविषयी सालिम साशंक होता. तेहमिना वाढलीय समृद्ध वातावरणात. तेव्हायमध्ये आपल्याकडे अत्याधुनिक सुखसोयी, साधनं नाहीत. तिथे ही कशी काय जुळवून घेईल याची त्याला शंका होती. त्यात पुन्हा आपल्याला रानावनातून भ्रमंती करायला आवडतं हे तिला रुचेल का हाही प्रश्नच होता. त्यामुळे तेहमिनासंबंधीच्या प्रस्तावाविषयी तो थोडा अलिप्त नि अनुत्सुक होता.



आपल्या शंका अनाठायी आहेत याचं प्रत्यंतर त्याला प्रथम भेटीतच आलं. तिच्या व आपल्या आवडी-निवडी बऱ्याचशा मिळत्याजुळत्या आहेत हे त्याच्या लक्षात आलं. 'फिनिशिंग स्कूल'मध्ये जाऊनही तिचं देशी व्यक्तिमत्त्व फिनिश न होता अबाधित आहे याची खात्री त्याला पटली. आपल्याप्रमाणे तिलाही पार्ट्या, मेजवान्यांचं, कृत्रिम वातावरणाचं आकर्षण नाही, उलट तिला आपल्याप्रमाणेच निकटवर्ती मित्रमंडळींत वावरायला आवडतं. बागबगिचा फुलवायला आवडतो, रानावनातली भ्रमंती मानवते हे सालिमच्या ध्यानात आलं. तिला इंग्रजी, उर्दू साहित्यात गम्य आहे, रस आहे हे समजल्यावर तर त्याला विशेष दिलासा मिळाला... त्याची अनुत्सुकता विरली... भेटीगाठी वाढल्या...

१९१८ च्या डिसेंबरमध्ये तेहमिना-सालिम विवाहबद्ध झाले. आणि पुढच्या महिन्यात उभयता तेव्हायला गेले.

तेव्हायमध्ये सालिम-तेहमिनानं छोटंसं घरटं उभारलं. त्या घरट्याभोवती तेहमिनानं हौसेनं बाग फुलवली. भाजीपाला लावला. कोंबड्या पाळल्या. रुपेरी बर्मी वनमोराची पिल्लं वाढवली. बिबटं मांजर, उडणारं माकड, मोठा धनेश, काळा चाष, खार, झालंच तर एक कुत्रा... या साऱ्यांना आसरा दिला. सालिमने एकदोन वाघांची शिकारही करून घेतली... दिवस कसे सुखात चालले होते...

पण हा सुखाचा काळ लवकरच आटला. अलीबंधूंचा लोखंडाचा व्यापार बसला नि त्यांची आर्थिक कोंडी होऊ लागली... कर्जाचे डोंगर चढले. जाबिरभाई नव्या व्यापाराच्या शोधात रंगूनला गेले. सालिमनेही एका पारशी मित्राच्या भागीत नवा धंदा सुरू केला. भारतातील लोहमार्गासाठी लाकडी स्लिपर्स पुरवण्याचे कंत्राट घेतले.

या सुमारास जाबिरभाईची पत्नी नि तेहमिना भारतात परतल्या.

लाकडी स्लिपर्ससाठी लाकूड शोधण्याच्या निमित्ताने ब्रह्मदेशातली जंगलं सालिमने पालथी घातली. हा लाकूड पुरवण्याचा धंदा पुढे तोट्यात गेला तरी लाकूड शोधण्यासाठी केलेली भ्रमंती त्याच्या विचारांना नवी दिशा देणारी ठरली.

तेहमिनाने सालिमला वाढदिवसानिमित्त मॉसर बंदूक भेट दिली होती. ती खांद्यावर टाकून, पाठीवर बाडबिस्तरा बांधून तो भ्रमंतीसाठी निघे. डास-जळवांना तोंड देत, डाळ-भातावर भूक भागवत, पावसाची रिपरिप सहन करत, दमट ओलसर बिछान्यावर रात्र काढत तो मनमुराद भटकला. अगदी जवळून निसर्गाचं दर्शन घेतलं. वनस्पती आणि प्राणी यांच्याशी दाट परिचय झाला आणि हीच जवळीक, हीच मैत्री त्याच्या पुढच्या आयुष्याला पुरून उरली.

धंद्यातले टक्के-टोणपे खाऊन अक्कलखाती तीन वर्षं जमा करून रिकाम्या हातांनी नि उलट्या खिशांनी सालिम १९२४ साली मायदेशी परतला.





मायदेशी परतल्यावर मुंबईत राहायचं कुठे हा सालिम-तेहमिनापुढे प्रश्नच होता, कधी अली कुटुंबीयांच्या तर कधी लतिफ कुटुंबीयांच्या आसऱ्याखाली ते दिवस काढत होते. पदरी कोणतीही पदवी नसल्याने सालिमला मनाजोगी नोकरी मिळणं तर कठीणच होतं.

नोकरीच्या शोधाबरोबर सालिमचा पक्षिशोधही चालूच होता. आपल्या बहिणीकडे वांद्र्याच्या पालीहिलवरच्या बंगल्यात तो काही काळ होता. तेव्हाही भोवतीच्या दाट झाडीत पक्ष्यांचा मागोवा काढत तो हिंडला. त्या काळी तिथवर वीजही पोचली नव्हती. रस्तेही कच्चेच. पाणी-पुरवठाही अनियमित. छोटे छोटे बंगले नि हापूसपायरीच्या बागा असं त्या भागाचं स्वरूप होतं. वांद्र्याच्या पूर्वेला खार, सांताक्रूझ, विलेपार्ले ही गावठाणं नि मच्छीमारीची ठिकाणं होती. तर दक्षिणेला भातशेती, आमराया, बाभूळबनं. बोरी, शिंदी, करवंदं यांची दाट झाडी. या दाट झाडीतून पक्ष्यांचा मागोवा काढत सालिम भटकला. अनेक पक्षि नमुने जमवले. पवई, विहारलेक, तुलसीतलाव, मुलूंड, विक्रोळी, भांडूप... सारी गावठाणं पालथी घातली. तिथल्या साऱ्या पक्षिजगताची टिपणं ठेवली. नोंदी केल्या.

सालिम पक्ष्यांचा मागोवा घेत होता आणि तेहमिनाचं मन त्याच्या छंदाची नोंद घेत होतं. सालिमचा कल कोणत्या दिशेला आहे याचा अंदाज आता तिला पूर्णपणे आला. निसर्गअभ्यास आणि पक्षिशास्त्र यांत तो मनानं खूप खोलवर गुंतलाय याची पुरती खात्री पटली. म्हणूनच, रस नाही त्या क्षेत्रात त्याला केवळ अर्थार्जनासाठी नोकरी करावी लागू नये यासाठी ती दक्ष झाली. एवढंच नव्हे तर स्वत: बॉम्बे प्रेसिडेन्सी विमेन्स कौन्सिलच्या सेक्रेटरीपदाची नोकरी स्वीकारून सालिमच्या बेकारीच्या काळात त्याच्या पाठीशी खंबीरपणे उभी राहिली. या ना त्या नातेवाईकाकडे आसरा घेताना कुठे ना कुठे वाच्यता, चर्चा होणं, टीका होणं अटळ होतं. पण त्या नाराजीला, टीकेला दाद न देता ती सालिमची बाजू सावरत राहिली.

याच सुमारास प्रिन्स् ऑफ वेल्स् म्युझियमच्या निसर्गइतिहास विभागासाठी गाईड लेक्चररची जागा जाहीर झाली. बॉ. नॅ. हि. सोसायटीचे क्युरेटर प्रेटर हे सालिमचे मित्र. यांच्या अधिकारकक्षेत हे पद येत होतं. त्यामुळे सालिमची सोय झाली. नोकरी हवी तशी नि हवी तिथे मिळाली याचं समाधान सालिम नि तेहमिनाला वाटलं. दोघंही नोकरीला लागल्यावर भायखळ्याला स्वतंत्र फ्लॅटमध्ये राहू लागले.

गाईड लेक्चररच्या नोकरीत सालिमने विविध उपक्रम आखले नि पार पाडले. विद्यार्थी, शिक्षक यांना निसर्ग-अभ्यासाकडे आकर्षित करण्यासाठी अनेक योजना आखल्या. काही निवडक माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शाळांतून प्राणिजीवनावर व्याख्यानं दिली. स्लाईड शोज् केले. निसर्गसहली आयोजल्या. एका उपक्रमात तर अंध



विद्यार्थ्यांनाही सहभागी केलं. नुसत्या हस्तस्पर्शाने पक्षी नमुने ओळखण्याचं त्यांचं कसब पाहून तो चकित व्हायचा.

थोडी सुस्थिती आल्यावर सालिमने एक छोटी ऑस्टिन मोटार खरीदली. तेहमिना तिला 'जेन' म्हणे. ही 'जेन' ऑस्टिन गॅलनभर पेट्रोलमध्ये चाळीस मैल धावे. या गाडीतून अली पति-पत्नी पुणे, औरंगाबाद, नासिकपर्यंतचे दौरे काढत. पक्ष्यांच्या मागावर जात. या गाडीमुळे सालिमला साप्ताहिक सुट्टीत मुंबईबाहेर दूरवर जाऊन पक्षी अभ्यासणं शक्य झालं.

एक-दोन वर्ष गाईड लेक्चररची नोकरी झाल्यावर सालिममधला पक्षी टोचा मारू लागला. पिंजऱ्यातून बाहेर पडण्यासाठी फडफडू लागला...

आपल्याला खरी ओढ आहे ती पक्षिजीवनाच्या अभ्यासाची. त्याविषयीचं प्रशिक्षण घ्यावं नि निसर्गात वावरणाऱ्या पक्ष्यांच्या जीवनाचा अभ्यास करावा. या अभ्यासाने संसार चालवण्यास काय मदत होईल न होईल ते पुढचं पुढे पाहू, असा विचार करून त्याने ठिकठिकाणी पत्रव्यवहार सुरू केला.

त्या वेळी म्हणजे १९२८-२९ च्या सुमारास भारतीय विद्यापीठं किंवा शैक्षणिक संस्थांतून पक्षि-विज्ञान अभ्यासक्रमाची सुविधा नव्हती. हा विषय उपेक्षितच होता. सालिमने लंडनमधील ब्रिटिश म्युझिअम्शी आणि बर्लिन विद्यापीठाच्या प्राणिसंग्रहालयाशी पत्रव्यवहार केला.

ब्रिटिश म्युझिअम्ने प्रतिसाद दिला नाही. बर्लिन विद्यापीठाकडून मात्र उत्साहवर्धक प्रतिसाद आला. तिथल्या प्रा. इरविन स्ट्रेसमन यांनी सालिमला लागलीच येण्याविषयी कळवलं आणि पक्षिवर्गीकरण शिकण्यासाठी सोबत भारतीय पक्ष्यांचे नमुने आणायला सांगितलं.

ब्रह्मदेशातील आय.सी.एस्. अधिकारी जे.के. स्टॅन्फर्ड यांनी सोसायटीला नुकतेच दोनशे पक्षी नमुने पाठवले होते. सालिमची गरज ओळखून सोसायटीचे क्युरेटर स्टॅन्ले प्रेटर यांनी तो संग्रह त्याच्या हवाली केला. प्रेटरसाहबांचे हे कृत्य पक्षितज्ज्ञ डॉ. क्लॉड बी. टाईसहर्स्ट यांना मुळीच पटलं नाही. त्यांनी तीव्र शब्दांत आपली नाराजी व्यक्त केली. डॉ. टाईसहर्स्ट हे भारतातले त्यावेळचे जुने-जाणते वजनदार ब्रिटिश पक्षितज्ज्ञ. ते स्वतः त्या नमुनासंग्रहाचे वर्गीकरण आणि सूचीकरण करणार होते. एका हिंदी नेटिवाने ते पक्षी घेऊन प्रशिक्षणासाठी परदेशी निघावं हे त्यांना रुचलं नाही. त्यांनी सोसायटीकडे आपला निषेध नोंदवला. परंतु स्टॅन्ले प्रेटरना सालिमविषयी खात्री होती. त्यांनी तो संग्रह त्याच्याच हवाली केला.

दोनशे पक्षिनमुने घेऊन सालिम-तेहमिना बर्लिनला पोचले.

बर्लिनमध्ये प्रा. स्ट्रेसमन यांच्या सहवासाचा, ज्ञानाचा आणि मार्गदर्शनचा लाभ





सालिमला घडला. ही त्याच्या आयुष्यातली लक्षणीय घटना. सालिमच्या भावी कर्तृत्वाचा पाया घातला गेला तो इथेच.

आपल्या या गुरूच्या हाताखाली सालिमने पक्षिवर्गीकरणाचे प्रशिक्षण घेतले. पर्यावरण, प्राणिभूगोल या बाबतीतील आपल्या शंकांचं निरसन करून घेतलं.

बर्लिन येथील वास्तव्यात सालिमला पक्षिजीवनाचा विविधांगांनी अभ्यास करणाऱ्या इतर पक्षिशास्त्रज्ञांच्या सहवासाचाही लाभ घडला. बर्नार्ड रेन्श हा तरुण प्राणिशास्त्रज्ञ. हवामानाच्या बदलामुळे होणाऱ्या भौगोलिक बदलांचा पक्षिजीवनावर कोणता परिणाम होतो याचा तो अभ्यास करत होता. तर हेन्रॉथ हे पक्षितज्ज्ञ-दांपत्य पक्ष्यांच्या वर्तनशास्त्राचा अभ्यास करत होते. यांच्याशी सालिमची वेळोवेळी चर्चा चाले. सालिमच्या विचारांना खाद्य मिळे. भारतीय पक्ष्यांच्या वर्तनशास्त्राच्या अनुषंगाने अभ्यास करायला तो उद्युक्त झाला... त्याच्या विचारांना भरारी मिळाली. भारतीय पक्षिशास्त्राला नवी दिशा देणारे विचार सालिमच्या डोक्यात रुजले ते इथेच.

बर्लिनमधील वास्तव्यात आणखीही एक महत्त्वाचे प्रशिक्षण त्याला मिळाले. हेलिगोलॅण्ड बेटावर पक्ष्यांच्या स्थलांतरणाचा अभ्यास करण्यासाठी त्यांच्या पायात कडी चढवण्याचा उपक्रम चालू होता. त्यात त्याने भाग घेतला. सोबत तेहमिनाही होती.

अनुभवांचे नि प्रशिक्षणाचे सकस पाथेय घेऊन अली पतिपत्नी परतीच्या प्रवासाला निघाले. जर्मनीहून प्रथम ते लंडनला गेले. तिथे ब्रिटिश म्युझिअम्मध्ये सालिमने काही महिने कार्यानुभव घेतला. आणि मग उभयता मायदेशी परतले.

भारतात परतल्यावर सालिम अली नोकरीसाठी शोधाशोध करू लागले. केवळ अर्थार्जनासाठी म्हणून त्यांना नोकरी करायची नव्हती. आपल्या आवडीच्या क्षेत्रात मिळाली तर मात्र ती हवी होती. तेहमिनाचाही या विचाराला पाठिंबा होता.

प्रशिक्षित होऊनही मनाजोगती नोकरी काही मिळत नव्हती. याही वेळी त्यांना आपल्या निकटवर्ती नातेवाईकांचा आसरा घ्यावा लागला. मागच्या इतिहासाची पुनरावृत्ती होऊ लागली. मात्र या वेळी तेहमिनाने आपली भूमिका अधिक ठामपणे, खंबीरपणे स्पष्ट केली. सालिम अलींनी आपल्या मनाविरुद्ध कोणतीही नोकरी वा व्यवसाय पत्करू नये, त्यापेक्षा स्वतंत्रपणे पक्षि-अभ्यास चालू ठेवावा असा मनोदय व्यक्त केला.

तेहमिनाच्या माहेरून–लतिफ कुटुंबाकडून–आर्थिक मदत मिळत होती खरी पण उपजीविकेचे कोणतेही साधन हाताशी नसताना मुंबईत निभाव कसा लावावा, हा अली दांपत्यापुढे प्रश्नच होता. शेवटी त्यांनी मुंबई सोडून अलिबाग जवळच्या किहिमला जायचा निर्णय घेतला. किहिमला समुद्रकिनाऱ्याशी लतिफ कुटुंबीयांचे सुरेख कौलारू



घर होते. १९३० साली सालिम-तेहमिना तिथे वास्तव्याला गेले.

किहिमला आल्यावर सालिम अलींचा सारा वेळ पक्ष्यांचा मागोवा घेण्यातच जाऊ लागला.

किहिमच्या किनाऱ्यावर झाडाझाडांवर बाया सुगरण पक्ष्यांचा घरटी विणण्याचा मोसम सुरू होता. सालिम अलींचे लक्ष तिकडे गुंतले. त्या वीणवस्तीवर त्यांचा सारा वेळ जाऊ लागला. मात्र या वेळी नुसत्या निरीक्षण नोंदी न ठेवता तिथल्या जीवननाट्याची छायाचित्रंही घ्यायची असं त्यांनी ठरवलं. शिकारीच्या हौशीपायी, प्राणिपक्ष्यांना टिपण्यासाठी सालिम अलींनी बाळपणीच हाती बंदूक धरली. पण आता बंदुकीच्या जोडीला दुर्बीण आली. कॅमेरा आला.








बाया पक्ष्यांचा घरटी विणण्याचा उद्योग अगदी जवळून निरखता यावा आणि त्याची छायाचित्रंही घेता यावीत या दृष्टीनं सोयीचं असं एक झाड त्यांनी निवडलं. त्यावर कॅनव्हासचं एक छोटं लपण तयार केलं. दहाबारा फूट उंचावरच्या त्या लपणात ये-जा करणं सुलभ व्हावं म्हणून शिडीचीही सोय केली.

त्या छोट्या लपणात अवघडल्या स्थितीत तास न् तास बसून सालिम अली बायाच्या घरट्यावर पहारा देऊ लागले. महत्त्वाची प्रत्येक घटना नोंदवू लागले. छायाचित्रं घेऊ लागले...

आजवर कोणी कुठंच न नोंदलेल्या जीवननाट्याचे आपण साक्षीदार आहोत हे त्यांच्या लक्षात आलं. एक अनमोल ठेवा आपल्याला गवसलाय हे जाणवलं.

नवी नव्हाळीची चमकदार पिवळी पिसं लेऊन बाया नर बाभळीच्या नाहीतर शिंदीच्या झाडांवर घरटी विणताहेत... शेकडो घरटी विणली जाताहेत... एका विशिष्ट टप्प्याशी नर घरटं विणणं थांबवतात. ते अर्धमुर्ध बांधकाम पाहायला बाईसाहेब येतात... त्या घरट्याची आंतररचना तपासतात... काही घरटी नाकारली जातात... मादी घरट्याची आंतररचना तपासत असते तेव्हा नर त्या घरट्याला बाहेरून लटकून उतावीळपणे तिच्या निर्णयाची वाट पाहत असतो... मादीला घरटं पसंत नाही पडलं तर तो तातडीनं नवं घरटं उभारायला घेतो... विशिष्ट टप्प्याशी बांधकाम थांबवतो... मादी आंतररचना तपासते... घरटं मनास आलं तर त्याच घरट्यात लगेच झटपट मीलन उरकून पसंतीची खातरजमा होते... मग नशीबवान नर घरट्याची उर्वरित बांधणी पूर्ण करतो... त्याच्या घरट्याची मालकीण लवकरच त्यात अंडी घालते... उबवते... घरटी सजीव होतात.

नर मात्र गृहस्थी करत बसत नाही. ती जबाबदारी मादीची. एक घरटं बांधून पूर्ण होताच नर जवळच दुसरं घरटं बांधायला घेतो नि नव्या घरोब्याच्या तयारीला लागतो. दुसरं घरटं बांधणं विशिष्ट टप्प्यावर थांबवून नव्या गृहस्वामिनीच्या मान्यतेची उतावीळपणे वाट पाहत बसतो... याच क्रमाने एकाच हंगामात किमान तीनचार घरांचा तो दादला होतो...

हे जीवन-नाट्य टिपता टिपता एका विलक्षण अनुभूतीने सालिम अली भारावून गेले. एक अनोखा थरार अनुभवला. पक्षिविषयक पुस्तकांतून आजवर कोणीही न नोंदवलेला हा जीवनपट. आजवर परंपरेने कथित होत आलेल्या जीवनपटापेक्षा अगदी वेगळा. सालिम अलींना वाटलं – 'या पक्ष्यांनी ती पाठ्यपुस्तकं वाचली नसावीत. नाहीतर असे छापील शब्द ओलांडून ते वागते ना!'

सालिम अलींनी नोंदी, रेखाटन, छायाचित्रं यांच्या आधारे एक मोठं बाडच तयार केलं. आजवरच्या समजुतीला धक्का देणारी विधानं करताना, पुराव्यानिशी ती सिद्ध करण्यासाठी त्या साऱ्याची आवश्यकता होतीच. या पुराव्यांचा वापर करून त्यांनी एक



प्रदीर्घ लेख सोसायटीच्या जर्नलमधून प्रकाशित केला. पक्षिविज्ञान जगतानेही त्याची यथोचित दखल घेतली.

या अनुभवाने सालिम अलींना सावध केलं. शहाणं केलं. कोणी काय लिहून ठेवलंय यावर विसंबून न राहता प्रत्यक्ष अवलोकनाने सारं तपासून घ्यायला हवं याची खूणगाठ त्यांनी बांधली. अशा पद्धतीने अभ्यास करून त्याचे निष्कर्ष जगापुढे मांडण्याचं काम आपलंच आहे असा निश्चय आपल्या मनाशी केला.

संग्रहालयात बसून मृत पक्ष्यांचे नमुने पुढ्यात ठेवून, पक्षिशास्त्राचा अभ्यास खूप केला गेलाय. आता निसर्गात वावरणाऱ्या जिवंत पक्ष्यांचा, त्यांच्या जीवनक्रमांचा, जीवननाट्याचा अभ्यास करायचा. भारतीय पक्ष्यांचा मागोवा घ्यायचा. त्यांची सूचीकरण करायचं. भारतीय पक्षिशास्त्राची उभारणी शास्त्रशुद्ध नि मजबूत पायावर करायची आणि जागतिक पक्षिविज्ञानाच्या फलकावर त्याला स्थान मिळवून द्यायचं या दृढ निश्चयाने ते पुढच्या तयारीला लागले.







# पक्षियात्रा

१९२४-२५ सालापासूनच सालिम अलींनी बंदूक, दुर्बीण, कॅमेरा यांच्या बरोबरीने लेखणीही हाती धरली. तेव्हापासूनच त्यांची पक्षिनिरीक्षणे सोसायटीच्या जर्नलमधून प्रसिद्ध होत होती.

जर्नलच्या १९२६ सालच्या एका अंकात त्यांनी 'मुघल एम्परर्स ऑफ इंडिया ॲज नॅचरॅलिस्टस्' या शीर्षकाचा प्रदीर्घ लेख लिहिला. बाबरापासून औरंगजेबपर्यंतच्या बखरींतून आणि तत्कालीन अन्य साहित्यातून पशू, पक्षी, वनस्पतीविषयीचे आढळणारे त्या सम्राटांचे अनुभव, विचार यांचा त्यांनी शोध घेतला.

जर्नलच्या १ मार्च १९२७ च्या अंकात त्यांनी 'द मेटिंग ऑफ् पॅराकिट्स्' हे निरीक्षण प्रसिद्ध केले. ते किती बारकाव्याने निरीक्षणे करत आणि नोंदी घेत याचं प्रत्यंतर या लेखात येतं. पक्ष्यांच्या वर्तनशास्त्राच्या अभ्यासाने त्यांना झपाटलंच होतं.

१९२८ सालात प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या एका निरीक्षणाने तर पक्षितज्ज्ञ मंडळींच्या वर्तुळात चांगलीच खळबळ उडवून दिली. त्या साली जर्नलमधून 'द स्टडी ऑफ् इंडियन बर्डस्' ही लेखमाला चालू होती. त्यातील एका लेखात ब्रिटिश पक्षितज्ज्ञ ह्यू



व्हिस्लर यांचे रॅकेट टेल्ड कोतवालाच्या शेपटीवरील पिसांच्या रचनेच्या संदर्भातील विधान सालिम अलींना चुकीचे वाटले. आपल्या निरीक्षणाचा पुरावा देऊन व्हिस्लरसाहेबांची चूक एका लेखाद्वारे जर्नलमध्ये दाखवून दिली.

कधीकधी आपली पक्षि-निरीक्षणं जर्नलमधून प्रसिद्ध करणारा, किंवा संपादकास पत्र पाठवणारा कोणी एक सालिम अली एवढीच ओळख व्हिस्लरना होती. तेव्हा कोणा ऐऱ्या-गैऱ्याने जाहीरपणे आपलं म्हणणं खोडून काढावं हे त्यांना रुचलं नाही. त्यांनी लागलीच जर्नलच्या संपादकाला नापसंतीदर्शक पत्र पाठवलं खरं पण हा कोणी सालिम अली म्हणतोच आहे तर पुन्हा एकदा खात्री करून घेऊया म्हणून त्यांनी पुन्हा एकदा पिसांची रचना अभ्यासली. आणि मग सालिम अली म्हणताहेत तेच बरोबर आहे हे त्यांच्या लक्षात आलं. विशेष म्हणजे व्हिस्लरनी संपादकाला पत्र लिहून आपली चूक मान्य केली.

१९३० साली सालिम अलींचा बाया पक्ष्यांवरील दीर्घ लेख सोसायटीच्या जर्नलमध्ये प्रसिद्ध झाला. 'सर्वसामान्य पक्ष्यांवरही किती नवीन माहिती मिळू शकते हे या लेखाने सिद्ध केलेय' अशी पावती अनेक मान्यवर पक्षितज्ज्ञांनी दिली.

याच सुमारास सोसायटीने अमेरिकन उद्योगपती व्हर्ने-पुरस्कृत पूर्वघाट पक्षि सर्वेक्षण पार पाडले. आता सोसायटी आणखी पक्षिसर्वेक्षण मोहिमा हाती घेऊ इच्छिते असं समजताच हे काम आपण हाती घ्यावं असं सालिम अलींनी ठरवलं. पूर्वघाट लगतच्या हैदराबाद संस्थानचं पक्षि-सर्वेक्षण करण्याच्या दृष्टीनं त्यांनी सोसायटीपुढे आपली योजना ठेवली. स्वत:च्या जबाबदारीवर परंतु सोसायटीच्या सहकार्याने हे सर्वेक्षण पार पाडायचा प्रस्ताव त्यांनी सोसायटीसमोर मांडला.

सालिम अलींचा प्रस्ताव सोसायटीने मान्य केला आणि त्यासंबंधात तिने हैदराबाद संस्थानशी पत्रव्यवहार केला. हैदराबाद संस्थानने या कामासाठी तीन महिन्यांकरता तीन हजार रुपये मंजूर केले.

आपल्या या उपक्रमासाठी मार्गदर्शन मिळवण्याच्या दृष्टीनं सालिम अलींनी ह्यू व्हिस्लरना पत्र पाठवलं.

कोतवाल पक्ष्यांच्या शेपटी प्रकरणानंतर व्हिस्लर आणि सालिम अली यांचा परस्पर परिचय वाढला होता. त्यांचा पत्रव्यवहारही वाढला होता. कोणतेही किल्मिष मनी न ठेवता ज्ञानाची देवाणघेवाण सुरू होती.

दरम्यान व्हिस्लर इंग्रज सरकारच्या सेवेतून निवृत्त होऊन मायदेशी इंग्लंडला परतले होते. त्यांना पत्र पाठवून सालिम अलींनी सर्वेक्षणाबाबत सल्ला मागितला.

सालिम अली ह्यू व्हिस्लरच्या मार्गदर्शनाखाली परंतु स्वतंत्रपणे हैदराबाद पक्षि सर्वेक्षण करताहेत हे समजल्यावर टाईसहर्स्टनी त्यात दखल द्यायला सुरुवात केली.





तोच जुना राग– आपल्या विरोधाला न जुमानता प्रेटरने सालिम अलींना दोनशे पक्षि-नमुने दिले. – अजूनही त्यांच्या मनात खदखदत होता. आता तर हा हिंदी नेटीव स्वतंत्रपणे पक्षिसर्वेक्षण करणार आहे. आणि याचं काम केवळ पक्षि-नमुने गोळा करण्यावर थांबणार नसून तो पर्यावरणाचा नि परिसंस्थेचाही अभ्यास करणार आहे हे समजल्यावर त्यांनी व्हिस्लरला पत्र पाठवून सुचवलं की सालिम अलींनी फक्त पक्षि-नमुनेच गोळा करावेत हे बरं.

एका नेटिवानं इंग्रज पक्षितज्ज्ञापुढं दौड मारावी हे टाईसहर्स्टना मानवत नव्हतं. त्यांच्या पत्राविषयी सालिम अलींना समजलं तेव्हा त्यांनी व्हिस्लरना पत्र पाठवून (१२.१.१९३१) स्पष्टपणे आपले विचार कळवले... 'सालिम अलीपेक्षा अधिक ज्ञान असणाऱ्याचाच सल्ला त्याला मान्य आहे हे तुमच्या मित्राला कळवा... कोणीही उठावं आणि मला ज्ञान शिकवावं हे मला चालणार नाही... सालिम अली काही सोसायटीचा पगारदार नोकर नाही... त्याला ज्यात काही स्वारस्य आहे आणि जे कार्य पार पाडल्याने ज्ञानात भर पडणार आहे, तेच तो करू इच्छितो हे त्यांना सांगा... सर्वात महत्त्वाचे म्हणजे सालिम अलीलाही स्वत:करता काही शिकायचं आहे, जातीनं काही अनुभवायचं आहे. केवळ पक्षी मारून त्यांचे वर्गीकरण, नामकरण, सूचीकरण करण्यातच त्याला स्वारस्य नाही हेही त्यांना कळवा... पर्यावरणाचा अभ्यास हे तर माझ्या सर्वेक्षण मोहिमेचं प्रमुख उद्दिष्ट आहे...'

या पक्षिसर्वेक्षण मोहिमेत जमवलेल्या पक्षी नमुन्यांचं वर्गीकरण करण्याची जबाबदारी व्हिस्लरनी उचलली. संपूर्ण सहकार्याचं आश्वासनही त्यांनी दिलं. टाईसहर्स्टचा सल्ला व्हिस्लरनी मानला नाही एवढंच नव्हे तर सालिम अलींना एक खास पत्र पाठवून (६.९.१९३१) सर्वेक्षणात कोणती खबरदारी घ्यावी, रोजनिशी कशी असावी, नोंदी कशा घ्याव्यात, कोणती पथ्यं पाळावीत याविषयी तपशीलवार सूचनाही दिल्या. (या पत्राचं मोल सालिम अलींना एवढं की पुढे पन्नास वर्षांनी त्यांनी आत्मचरित्रात एका खास परिशिष्टात ते उद्धृत केलं.)

हैदराबाद पक्षि सर्वेक्षणाचा अहवाल सालिम अलींनी सोसायटीच्या जर्नलमधून प्रसिद्ध केला. पक्षिनिरीक्षणं नोंदवता नोंदवता तिथल्या वनस्पतिसृष्टीची, पक्षी-वनस्पती यांतील परस्परपूरकतेची टिपणं त्यांनी दिली. या अहवालात पक्ष्यांचं मानवी जीवनात अर्थशास्त्रीय दृष्ट्या स्थान ठरवण्याबद्दलचे विचारही त्यांनी मांडले. पिके उद्ध्वस्त करणारे पक्षी, पिकाला संरक्षण देणारे पक्षी, परिसर स्वच्छ ठेवणारे पक्षी या व अशा विविध दृष्टिकोनांतून ह्या अहवालाची मांडणी केली. अशा प्रकारचा अहवाल भारतीय पक्षिशास्त्राच्या दृष्टीने आगळाच होता. अशा पैलूंवर प्रकाश टाकण्याचं काम यापूर्वी भारतात झालेलं नव्हतं. एक नवंच दालन सालिम अलींनी खुलं केलं. प्रा. स्टेमनना



या अहवालाची प्रत मिळताच त्यांनी आपल्या शिष्याचं मन:पूर्वक अभिनंदन केलं.

या सर्वेक्षणापोटी सालिम अलींना कोणता आर्थिक लाभ घडला नाही की मानमरातब लाभला नाही. लाभलं ते मन:पूत समाधान. भारतीय पक्षिविज्ञानात आपण नवी भर टाकू शकतो हा अनुभव नि आत्मविश्वास.

हैदराबाद पक्षि-सर्वेक्षण ही त्यांच्या पक्षियात्रेची सुरुवात होती. पक्षिसर्वेक्षण मोहिमांमागची आपली भूमिका विशद करताना त्यांनी आपल्या स्नेह्याला – राल्फ मॉरिस यांना लिहिलं (२५-६-१९३६) '...पक्षी टिपून मारायचे, त्यांचे नमुने तयार करायचे आणि परदेशीयांची, त्यांच्या संग्रहालयांची भर करत राहायची किंवा त्यांना पक्ष्यांची काटेकोर मापे घेता यावीत, तपशीलवार नोंदी-टिपणं ठेवता यावीत म्हणून पक्षि-नमुने पाठवून त्यांचे कोड पुरवायचे हा माझ्या पक्षिसर्वेक्षणांमागचा हेतू नाही... बारकाईनं पक्षि निरीक्षण करून मला त्यांचं वर्तन, जीवन समजून घ्यायचंय. त्यांची परिसंस्था समजून घेण्याची माझी








तीव्र इच्छा आहे...' 'भारतीय पक्षिशास्त्राचा प्रगत अभ्यासक्रम याच पायावर आधारित हवा आणि म्हणूनच त्याची आखणी व्यवस्थित व्हायला हवी' असा त्यांचा आग्रह रास्तच होता.

हैदराबाद पक्षि-सर्वेक्षणानंतर सालिम अलींनी त्रावणकोर-कोचीन पक्षि सर्वेक्षण हाती घेतले. हे सर्वेक्षण अनेक दृष्ट्या महत्त्वाचं ठरलं. १९३० साली पक्षितज्ज्ञ, इ.सी. स्टुअर्टबेकर यांनी ओट्स आणि ब्लँडफोर्ड यांच्या 'फौना ऑफ ब्रिटिश इंडिया' या मालिकेतील पक्षिविषयक चार खंडांची सुधारित सहा खंडात्मक आवृत्ती काढली. मात्र असं करताना काही ठसठशीत नि ढोबळ चुका केल्या होत्या. प्रत्यक्ष न पाहिलेल्या भूप्रदेशातील पक्ष्यांविषयी त्यांनी ऐकीव माहितीवर दडपून लिहिलं होतं.

त्रावणकोरमध्ये एका विशिष्ट पक्ष्यांची अंडी विशिष्ट ठिकाणी आढळल्याचे स्टुअर्टबेकरनी नमूद केलं होतं. परंतु प्रत्यक्ष सर्वेक्षण करतेवेळी सालिम अलींना त्या पक्ष्यांचा, त्यांच्या अंड्यांचा ठावठिकाणा लागेना. म्हणून मग त्यांनी स्थानिक आदिवासींकडे त्याविषयी चौकशी केली.

आदिवासींना पैसे देऊन स्टुअर्टबेकर पक्षी व अंडी गोळा करून घेत. त्या आदिवासींना काही पक्षी नेमकेपणाने ओळखता आले नव्हते. त्यामुळे त्यांच्या घरटी बांधण्याच्या सवयीविषयीच्या तपशिलात तफावत आढळत होती. अशा तफावती इतरही बाबतींत संभवत होत्या.

बाया पक्ष्यांच्या विणीच्या हंगामात घरटी बांधण्याच्या पद्धतीचं निरीक्षण केल्यावर, लिखित माहितीवर विसंबून राहता येईलच असं नाही असा अनुभव आल्यावर, सारं काही प्रत्यक्ष पाहून निष्कर्ष काढण्याची खूणगाठ त्यांनी मनाशी बांधली होती. तो विचार त्रावणकोर-कोचीन सर्वेक्षणानंतर अधोरेखित झाला. संपूर्ण भारतीय भूप्रदेशाचं पक्षि-सर्वेक्षण करून अधिकृत नोंदी ठेवणं ही आपलीच जबाबदारी आहे असं पुन्हा एकदा त्यांनी स्वत:ला बजावलं.

याच सुमारास सोसायटीने त्यांना ब्रिटिश पक्षितज्ज्ञ कर्नल मायनरझाहेन यांच्या अफगाणिस्तान पक्षि-सर्वेक्षण मोहिमेत सहभागी होण्यासंबंधी विचारणा केली. याही वेळी त्यांनी केवळ पक्षि-नमुने तयार करून देण्यासाठी आपल्याला अशा मोहिमांत सहभागी व्हायचे नाही, हवं तर त्यासाठी दुसरी माणसं नेमा असं स्पष्टपणे सोसायटीला सांगितलं. आपल्याला निरीक्षणातून पक्षिजीवन अभ्यासण्यात, पक्ष्यांच्या स्थलांतरण प्रक्रियेत, परिसंस्थेत अधिक रस आहे याचाही पुनरुच्चार केला.

सालिम अलींचे यापूर्वीचे सर्वेक्षण अहवाल क. मायनरझाहेन यांच्या वाचनात होते. सालिम अलींच्या वकुबाचाही अंदाज त्यांना आला होता. त्यामुळे सालिम अलींच्या म्हणण्याचा त्यांनी स्वीकार केला आणि आपल्या मोहिमेत सहभागी केलं.

अफगाणिस्तानात सालिम अलींना अनेक नवीन पक्षी पाहायला, निरीक्षण करायला मिळाले. हिम तितर, सी सी पार्ट्रीज... वगैरे. या सर्वेक्षण मोहिमेच्या सुमारास पक्ष्यांचं उत्तरेच्या दिशेने वासंतिक स्थलांतरण चालू होतं. याचंही अवलोकन त्यांना करता आलं. लाल पायांचे ससाणे, कस्तुरी ससाणे वगैरे मंडळी आफ्रिकेकडून पूर्व आशियाकडे निघाली होती. त्यांचीही भेट झाली. भारतातून भोरड्या येऊन इथे उतरल्या होत्या. तिथून पुढे त्या तुर्कस्थानात जाऊन, तिथे घरटी बांधून अंडी घालणार होत्या. त्यांचंही दर्शन घडलं. दलदलीतले ससाणे स्थलांतर करत होते. त्यांचाही एक थवा बामीयानमध्ये आढळला. ते आपल्या वीणवस्तीवर उत्तरेकडे जाताना विश्रांतीसाठी इथं उतरले होते.

अफगाणिस्तान पक्षि-सर्वेक्षणातील अनुभव सालिम अलींना विलक्षण उल्हसित करून गेला.

याच कालखंडातील आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे रोहितनगरीचा शोध. कच्छमध्ये नीरच्या ईशान्येला दहा किलोमीटर्सवर रोहितनगरी (फ्लेमिंगो सिटी) आहे. त्या नगरीचा प्रथमोल्लेख १८९६ साली झालेला आढळतो. विणीच्या हंगामात रोहित पक्षी रशियातून स्थलांतर करून भारतात इथवर येत असतात.

रणातल्या या रोहितनगरीपर्यंत पोचायचं तर नीरहून पायी अथवा तट्टावरून जावं लागतं. हा सर्व प्रदेश पाणथळ. कुठे घोट्याइतकं तर कुठे मांडीइतकं पाणी. हे पाणी म्हणजे मिठाचं अति संपृक्त द्रावण. काही भाग तर फार फसवा. मिठाच्या स्फटिकांच्या पातळ पापुद्र्याखाली चांगलाच चिखल असतो. हा थर वाळवंटी उन्हात विलक्षण चमकतो. त्यावरून परावर्तित होणारे सूर्यकिरण डोळ्यांना दिपवतात. मिठाचे स्फटिक धारदार त्यामुळे मिठाच्या पापुद्र्यावरून चालताना माणसाच्या पायालाच काय पण खेचरा-घोड्यांच्या खुरांनाही इजा होते. ओरखडे पडतात.

ही रोहितनगरी पाहण्यासाठी सालिम अली विलक्षण उत्सुक होते. ते त्या वीणवस्तीच्या अगदी निकट पोहोचले तेव्हा त्यांना हजारो घरट्यांचं दर्शन घडलं. ही घरटी म्हणजे जमिनीतून वर उगवल्यागत चिखलाचे उंचवटे. त्या उंचवट्याच्या माथ्यावर रोहित पक्ष्यांना अंडी घालायला सोयीचा असा खळगा. सालिम अलींनी नजरेनंच गणित मांडलं. घरट्यांची संख्या एक लाख पाच हजारांच्या घरात गेली. घरटी चार जणांचं कुटुंब मानलं तरी पाच लाखांचा हिशेब झाला. आशिया खंडातील ही सर्वांत मोठी रोहितनगरी. ह्या नगरीच्या दर्शनाने सालिम अली पुलकित झाले खरे; पण त्या वस्तीवर शुकशुकाट पाहून त्यांचा अपेक्षाभंग झाला. त्या वर्षी पुरेसा पाऊस न पडल्याने पाण्याची पातळी आवश्यक तेवढी वाढली नव्हती. त्यामुळे रोहित अंडी घालायला इकडे वळले नव्हते.

या मोहिमेत दोन हजार चौरस मैलांच्या प्रदेशाचे पक्षि-सर्वेक्षण झाले. आजवर हा





प्रदेश पक्षिविज्ञानदृष्ट्या असंशोधित, उपेक्षित होता. इथल्या अडतीस नव्या पक्षिजातींची नोंद झाली. आणि ज्यांची नोंद आधीच झालेली होती त्यांच्याविषयी अधिक माहिती मिळाली.

या भेटीनंतर पुढे कितीतरी वर्षं सालिम अली या रणातल्या रोहितनगरीला भेट देतच राहिले.

नंतरच्या भेटीत त्यांना उचाट आणि गुलाबी पेलिकन्स यांच्या वसाहतींचा शोध लागला. प्रथमच त्यांची माहिती उजेडात आली. रोहित पक्ष्यांची वापरात नसलेली घरटी गुलाबी पेलिकन्स वापरताना आढळले.

रणातल्या बनास नदीच्या काठच्या नयनोत्सवानं तर त्यांना भुरळच पाडली. लाखोंच्या संख्येनं पाणपक्षी... चक्रांग... चपट्या चोचीचे, अनेक जातींचे टिवले, क्रौंच, गुलाबी रोहित... दूरवर पक्षीच पक्षी... या दर्शनानं सालिम अलींच्यातला तो छोटा पक्षी विलक्षण सुखावला. मोहरून गेला.

१९३० ते १९५५ या पंचवीस वर्षांच्या कालावधीत सालिम अलींनी बॉ.नॅ.हि. सोसायटीच्या सहकार्याने भारतीय उपखंडातील बहुतेक सर्व प्रदेशांचे पक्षि-सर्वेक्षण पार पाडले. म्हैसूर, त्रावणकोर, कोचीन, भोपाळ, ग्वाल्हेर, भावलपूर... म. गांधींनंतर संपूर्ण भारत पादाक्रांत करणारी सालिम अलींखेरीज अन्य कोणी व्यक्ती नाही असं सार्थपणे म्हटलं जातं.

त्यांच्या पक्षि-सर्वेक्षणांचे अहवाल वैशिष्ट्यपूर्ण आणि महत्त्वाचे ठरले. आजवर विचारात न घेतलेल्या पर्यावरण, परिसंस्था, भौगोलिक घटकांचा विचारही त्यांत होता. त्यामुळे ह्यू व्हिस्लर, केनेथ मॅसन, टाईसहर्स्ट वगैरे आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या पक्षिशास्त्रज्ञांनीही त्या अहवालांचं कौतुक केलं. प्रा. स्ट्रेसमन यांचं आपल्या त्या शिष्याच्या कार्यावर लक्ष होतंच. तेही अनेकदा पत्र पाठवून सर्वेक्षण अहवालावर मत व्यक्त करत. त्यांना एका पत्रात (१९३६) सालिम अली लिहितात – 'भारतासारख्या कृषिप्रधान देशात पक्ष्यांच्या परिसंस्थेच्या, परिस्थितीच्या दृष्टिकोनातून अभ्यास होणं जरुरीचं आहे... इथे सर्व प्रकारचे हवामान व भूप्रदेश आहेत. अशा प्रकारच्या अभ्यासातून निश्चित स्वरूपाचे काही निष्कर्षही मांडता येण्याजोगे आहेत.'

बंगलोरहून प्रसिद्ध होणाऱ्या 'करंट सायन्स' नियतकालिकाच्या (१९६३ सालच्या) अंकात त्यांनी Economic Ornithology in India हा लेख लिहिला. त्यातही त्यांनी '...एक वेळ माणसांअभावी पक्षी जगू शकतील, पण पक्ष्यांअभावी माणूस जगणार नाही...' असा इशारा देऊन पक्षि अभ्यासाची, निरीक्षणाद्वारे त्यांच्या खाद्यसवयी समजून घेण्याची, शेती-जंगले यांच्या संदर्भात पक्ष्यांचे महत्त्व जाणून घेण्याची आवश्यकता जाणवून दिली.



देशातील अन्नधान्य वाढविण्याच्या मोहिमेत पक्ष्यांच्या अस्तित्वाचा, त्यांच्या खाद्यसवयींचा विचार व्हायला हवा असा त्यांचा आग्रह होता. त्यांच्या आग्रहामुळे, जाणीवपूर्वक प्रयत्नांमुळे नंतरच्या काळात अनेक भारतीय कृषिविद्यापीठांनी अभ्यासक्रम आखले, उपक्रम सुरू केले. प्रकल्प उभे केले.

सालिम अलींच्या विचारांची, कार्याची जाण पंतप्रधान पं. नेहरूंना फार सुरुवातीपासून होती. त्यांनी वेळोवेळी सालिम अलींना प्रोत्साहन दिलं. सालिम अलींच्या कार्याची माहिती जनसामान्यांना झाली ती १९५८ साली त्यांना पद्मभूषण किताब मिळाला तेव्हा. त्यानंतरच्या त्यांच्या पक्षिनिरीक्षण मोहिमा अधिक सुकर झाल्या. पंतप्रधान इंदिरा गांधींनीही त्यांच्या कार्याची चाहा केली. सरकार दरबारी सालिम अलींच्या शब्दाला अधिक वजन आलं.

हे झालं नंतरचं. पण सालिम अली कोण हे लोकांना माहीत नव्हतं, सरकार-दरबारी त्यांच्या कामाची दखल नव्हती, पक्षिशास्त्राविषयी समाजात अज्ञान आणि उपेक्षा होती त्या सुरुवातीच्या काळात त्यांनी आपलं कार्य कसं पार पाडलं असेल?

पैशाची चणचण, वाहतुकीची गैरसोय, आधुनिक साधनांचा अभाव अशा परिस्थितीत त्यांनी पक्षि-सर्वेक्षणं कशी पार पाडली असतील याचा काहीसा अंदाज त्यांच्या आत्मचरित्रावरून येतो; तसंच त्यांच्या आयुष्यात १९४३ साली प्रवेशलेले त्यांचे परमस्नेही लोक वान थो यांच्या अप्रकाशित रोजनिशांतील नोंदीवरून येतो. १९४३ ते १९६३ पर्यंतच्या कालावधीत ते सालिम अलींसमवेत अनेक पक्षिनिरीक्षण आणि सर्वेक्षण मोहिमांत सहभागी असत. पक्षि-मोहिमांची टिपणं घेता घेता त्यांनी सालिम अलींच्या बाबतीतही नोंदवून ठेवलंय. मोहिमेतले अनुभवही शब्दबद्ध केलेत. त्यावरून त्या वेळच्या परिस्थितीचा, कष्टांचा अंदाज येतो.

रणरणती उन्हं, तप्त फुफाटा, खडकाळ दुष्कर रस्ते, धिम्या गतीने चालणाऱ्या बैलगाड्या. यातून मध्येच कधीतरी बैलगाड्यांचा आख तुटे. मग गाडीवान जंगलातून लाकूड मिळवून जुजबी दुरुस्ती करी नि मंडळी पुढे निघत.

कधी कधी उन्हाचा त्रास फारच जाणवे. अशा वेळी उन्हं उतरल्यावर प्रवास सुरू व्हायचा. तर कधीकधी रात्रीही प्रवास चाले.

आधीच आडगावातून बसवाहतूक ठिकाणावर नसे. त्यातून सालीम अली नि त्यांच्या सहकाऱ्यांचे तंबू पडत ते ठिकाण असे बसमार्गाहून दूर आत. कुठे कुठे खाजगी मोटारींची सोय असेही. पण त्या मोटारी कसल्या! जुन्या फोर्ड किंवा शेवरलेट गाड्या ठोकठाक करून, थोडंफार रूप बदलून पासिंजर कोंबायची कामचलाऊ सोय असे ती. त्या मोटारीतून प्रवास करताना हाड न् हाड खिळखिळं व्हायचं. या मोटारीच्या चालकांचा नि मालकांचा मनमानी कारभार. त्यामुळे सर्वेक्षणवाल्या मंडळींना मुक्काम








बदलताना, तळ हलवताना विचित्र अडचणींना तोंड द्यावे लागे. पुन्हा मंडळींचं सामान तरी काय थोडंथोडकं नसे. पक्षि-नमुने साठवायची खोकी, तेलातुपाचे डबे, रॉकेलचे डबे, कॅम्प कॉट्स, कंदील, डबे, भांडी, कपडे, चोपड्या... एक ना हजार.

मुक्कामाची ठिकाणं तरी काय? कधी उतारू बंगला तर कधी पोलिस चौकी, कधी कधी तर पडका गोठाही असे.

अशा चौकीत किंवा गोठ्यात चार दिवस मुक्काम असला की तेहमिना पदर खोचून कामाला लागे. हातात झाडू खराटा घेऊन तो निवास नि परिसर साफसूफ करी. सालिम अलींचं लिहिण्याचं टेबल फुलदाणीनं सजे. पडदे, कपबशा जागच्याजागी लागत. तेहमिनाच्या कुशल हातांनी त्या जागेचा कायापालट व्हायचा. ते ठिकाण प्रसन्न व्हायचं.

आणि हे सगळं करून झालं की तेहमिनाही सदरा-तुमान चढवून, डोक्यावर हॅट घालून, हातात काठी नि गळ्यात दुर्बीण, कॅमेरा अडकवून पक्षिनिरीक्षणासाठी भ्रमंती करी. सालिमसाहेबांच्या पक्षिप्रेमाची, पक्षिनिरीक्षणाची लागण तिलाही झाली होती.



प्रतिदिनी किमान बारा मैलांची पायी भ्रमंती असे. रविवारची सुट्टी वगैरे प्रकार नसेच. वाहनसौख्य ही अपूर्वाईची गोष्ट... रस्ते कच्चे... खाच-खळग्यांचे. कधी फसवे तर कधी डोंगरकपारीतून वळणं घेत जाणारे. कधी चिखल तुडवत तर कधी दगड गोट्यांवरून घसरत पक्ष्यांचा मागोवा घेतला जायचा... जळवा, डास, माशा यांचा त्रास अटळच. जोडीला कधी धुळीची वादळे तर कधी अचानक कोसळणारा धुवांधार पाऊस. कुठे हिमवादळ तर कुठे भन्नाट वेगाने वाहणारा, डोकं ठणकावणारा वारा.

उतरायला असत पडकेमोडके निवास. तिथे कुठले स्नानगृह नि कुठले शौचालय! झाडाझुडपांच्या आडोशावर भागवावं लागे. रात्री सोबत असे घुबडं नि रातकिड्यांची. कच्छच्या पक्षिसर्वेक्षणाच्या मोहिमेच्या वेळी रणात उघड्यावर तंबू ठोकावा लागला तेव्हा तर त्यांची फारच पंचाईत. आडोशाला झाडझाडोरा म्हणून नाही. सिक्किम पक्षि-सर्वेक्षणाच्या वेळी त्यांचा मुक्काम सिंधिकला होता. तिथली पंचाईत लोक वान थो नमुनेदारपणे नोंदवतात – 'आम्हाला मिळालेल्या उतारू निवासात शौचालय नाही. निवासाबाहेर काही अंतरावर दोनच झुडपं आडोशासाठी आहेत... आज संध्याकाळी इंडियन बोटॅनिकल सर्व्हेची सहा माणसं उतारू बंगल्यात दाखल झालीत. म्हणजे, उद्या सकाळी फारच पंचाईत... दोन झुडपं नि आठ माणसं! फारच विचित्र.'

१९४३ मधली लोक वान थोंची एक नोंद त्यांच्या अन्नव्यवस्थेची चुणूक दाखवते. 'डबाबंद अन्न फार महाग पडतं म्हणून आम्ही ते आणीबाणीसाठी राखून ठेवतो... रोजचा आहार म्हणजे डाळ-भात, भात-डाळ, मधनंमधनं चपाती, केळं, दही, पपई, किंवा असंच काही तरी... हा (कच्छ) प्रदेश जैन धर्मीयांचा, त्यामुळे मांसाहार संपूर्णत: निषिद्ध... डबाबंद माशांचा वापर कधीकधी करतो. सालिम त्यांना गमतीनं विलायती माजरं म्हणतो... इथला चहा 'मसालेदार'. घशाखाली उतरता उतरत नाही.'

'...खवडा ग्रामात आमच्या निवासाची सोय एका हिंदु मंदिरात केली होती. पण इथे पक्षी मारून त्यांचे नमुने कसे गोळा करणार? माशी मारणं सुद्धा इथे पाप... आम्ही ते मंदिर सोडलं. जवळच काही अंतरावर एका शेतकऱ्याचं पडकं खोपटं राहायला मिळालं... इथे विंचवांची वस्ती... त्यांची व्यवस्था लावतो न लावतो तो बाहेर अंगणात खडखड्या सर्प हजर. त्याचीही सोय लावली... या रणात कवी शेले येऊन राहिला असता तर त्याच्या कविता किती वेगळ्या झाल्या असत्या!'

'प्यायच्या स्वच्छ पाण्याची मारामार, तिथं स्नानासाठी पाणी मिळणं दुरापास्तच. आणि ते तसं मिळालं तरी 'त्या पाण्यात विजेरीचा झोत सोडून पाहून घ्यावं लागे.'

'साधंसं जेवण, कपभर गरमगरम चहा, उबदार बिछाना, आठ तासांची निद्रा नि मधून मधून स्नानाची सोय,' ही त्या मोहिमांच्या काळातली सुखाची परम सीमा. आणि स्नानाला पाणी मिळालं तरी कपडे धुण्याइतकं मिळत नसे. मग चारचार दिवस एकच





एक शर्ट वापरावा लागे. '...यावरही सालिमची टिप्पणी आहेच – माझा शर्ट बघ कसा आधाराशिवाय स्वत:हून उभा राहतो!'

कोणत्याही गैरसोयींमुळे अडून न बसणं, हसतमुखाने उमदेपणाने सहन करत पुढे जात राहणं ही सालिम अलींची वृत्ती. प्राप्त परिस्थितीला विनोदाची झालर लावत तिला सुसह्य करायचं हा स्वभाव. त्यामुळे साधनसामग्रीच्या अभावाचा बाऊ न करता सुरुवातीच्या अडचणीच्या काळातली पक्षि-सर्वेक्षणं ते पार पाडू शकले.

या अशा अडचणींच्या हातात हात घालून अनेकदा संकटंही समोर उभी ठाकत. १९४५ साली त्यांनी कैलास-मान सरोवराची पक्षियात्रा केली. पट्टकादंब आणि काळ्या मानेचे सारस यांच्या घरटी बांधण्याच्या सवयी, पद्धती, त्यांच्या परिसंस्था यांचा त्यांना विशेष तपशिलाने अभ्यास करायचा होता.

या मोहिमेसाठी त्यांना फारच खडतर प्रवास करावा लागला. हिमवर्षाव, भूकंप, शिलापात, रक्त गोठवणारी थंडी, भुसभुशीत बर्फाचा मार्ग या साऱ्यांना तोंड देत पुढे जावं लागलं. वाहनसौख्य मिळालं ते याकचं. खूप उंचीवर गेल्यावर त्यांना डोकेदुखीचा त्रास होऊ लागला. तोही त्यांनी पक्षिप्रेमापायी गोड मानून घेतला.

मान सरोवराच्या जवळच डिंग त्सो सरोवर आहे. तिथे पाणपक्ष्यांच्या मागावर असताना तर ते बुडता बुडता वाचले. तर यलोनिपड बुहिना पक्ष्याला दुर्बिणीच्या कक्षेत घेता घेता रस्त्याच्या कडेवरनं खोल दरीत पडता पडता वाचले. प्रसंगावधान, सावध वृत्ती यामुळे स्वत:ला सावरू शकले, पक्ष्यासारख्या लवचीक शरीरामुळे शरीराचा भार सांभाळू शकले. तसंच, एका प्रसंगी अभिनयानेही त्यांना तारून नेलं.

मानसरोवराच्या परिसरात त्या सुमारास वाटमाऱ्यांचा नि लुटारूंचा सुळसुळाट होता. निराधार एकट्यादुकट्या यात्रेकरूंना ते लुबाडत. एके सकाळी सालिम अली एका वाटाड्यासमवेत भल्या पहाटे तळापासून बऱ्याच दूरवर गेले. या प्रदेशात पक्षी मारायचे नाहीत नि बंदुकीचा वापरही करायचा नाही या अटीवरच तिबेट सरकारने त्यांना मानसरोवराची पक्षियात्रा करायला अनुमती दिली होती. त्यामुळे सालिम अलींच्या हातात स्वसंरक्षणार्थ होती ती केवळ पक्षिनिरीक्षणाला जातेवेळी वापरण्याची 'शूटिंग स्टिक'.

तळापासून बरेच दूर आल्यावर एक वाटमाऱ्या दत्त म्हणून त्यांच्या समोर उभा राहिला. तळाच्या आसऱ्याला धाव घ्यावी तर तो खूप दूर राहिला होता. त्या तीस मैलांच्या परिसरात कोणी हाकेला ओ देऊन मदतीला येईल अशी शक्यता संभवत: नव्हती. भोवती उघडं मोकळं मैदान. त्यामुळं कुठं आडोशानं लपावं तर तीही संधी नाही.

सालिम अलींच्या विचारांनी भरारी मारली. बंदुकीच्या पद्धतीने शूटिंग स्टिक हाताळली. शूटिंग स्टिकच्या खटक्यांचा आवाज केला. ती 'बंदूक' खांद्याला लावून त्या लूटारूवर नेम धरला.



लुटारू पाय लावून पळत सुटला.

या आठवणीसंबंधी सालिम अली म्हणतात – 'आम्ही तिबेट सरकारच्या अटी पाळून नि:शस्त्र आलेलो आहोत हे त्या लुटारूला समजलं असतं तर!'

परतीच्या प्रवासात पहिल्याच पोस्टात त्यांनी जाबिरभाईना एका ओळीचं पत्र पाठवून आपली खुशाली कळवली – 'Over without cut-throat.'

सालिम अलींना स्वत:च्या जिवापेक्षाही मोठी चिंता होती ती वेगळीच.

१९३२ साली फ्रँक लडलो या पक्षितज्ज्ञाने या प्रदेशाचं पक्षिसर्वेक्षण केलं. त्याच्या नोंदी पडताळून पाहायच्या तर काही पक्षी मारून नमुने जमवायला हवेत. शिवाय आपल्या नियोजित 'बर्डस् ऑफ इंडियन हिल्स' या पुस्तकाला परिपूर्णता आणायची तर कैलास-मान सरोवरची पक्षि परिक्रमा करणे भाग आहे. पण पक्षी मारायला तर परवानगी नाही. तेव्हा तुलनात्मक अभ्यास व्हायचा कसा हीच चिंता त्यांना घेरून होती.

ही झाली १९४५ मधली हकीकत. पण १९६०-६२ च्या सुमारास कर्नाळा अभयारण्यात तर त्यांना विचित्र प्रसंगाला सामोरं जावं लागलं.

कर्नाळा अजून अभयारण्य म्हणून घोषित झालं नव्हतं. सालिम अली आणि ब्रिटिश पक्षितज्ज्ञ होरास अलेक्झांडर पक्षिनिरीक्षणासाठी त्या परिसरात फिरत होते. फिरता फिरता ते त्यांच्या स्टेशन वॅगनपासून बऱ्याच दूरवर आत जंगलात गेले.

त्याच सुमारास मुलं पळवणारी एक टोळी त्या भागात वावरतेय अशी अफवा उठलेली होती.

दाढी वाढलेली, डोक्यावर टोपी, डोळ्यांवर दुर्बीण अशा थाटात एकजण झाडंझुडपं शोधतोय. दुसरा, गोराही, तशीच शोधाशोध करतोय. हे दोघं त्या टोळीपैकीच असावेत असा तिथल्या खेडुतांचा समज झाला. त्या दोघांना घेरून पकडण्यासाठी त्या खेडुतांच्या हालचाली सुरू झाल्या. प्रसंग कठीण आहे हे सालिम अलींनी ताडले अन् स्टेशन वॅगनकडे धावले. आतली शॉटगन हातात घेतली. ती पाहून खेडुतांनी पळ काढला. थोड्याच वेळानं तिथली ठेकेदार मंडळी आली आणि मग खेडुतांचं संशय निराकरण झालं.

सालिम अलींच्या या पक्षिमोहिमा काही प्रमाणात सुकर केल्या त्या लोक वान थोंनी. त्यांच्यामुळे सालिम अलींना प्रथमच वाहनसौख्य लाभलं. १९४६ साली सालिम अली ओरिसाचं पक्षि-सर्वेक्षण करत होते. त्या कामासाठी एक जुनी मोटार त्यांना वापरायला मिळाली होती. ती गाडी वारंवार बंद पडे. मग सालिम अली आणि त्यांच्या सहकाऱ्यांना खाली उतरून तिला ढकलावं लागे. भर उन्हात असा प्रसंग गुदरला की उतारूंचा ताप वाढायचा. या मोहिमेत सालिम अलींसमवेत लोक वान थोही होते. गाडी ढकलून ढकलून अगदी जेरीस आले. या मोहिमेनंतर अल्पावधीतच लोक वान थो मायदेशी





सिंगापूरला परतले. मायदेशी परतल्यावर त्यांनी पहिलं काम कोणतं केलं तर सालिम साहेबांना नवी कोरी स्टेशन वॅगन खरीदण्यासाठी भला-भक्कम चेक पाठवला.

या स्टेशनवॅगनमुळे सालिम अलींच्या मोहिमा सुखकर झाल्या. त्यांना वेग आला. पण म्हणून बैलगाडीचं महत्त्व संपलं नाहीच.

अविकसित भागातील पक्षि-सर्वेक्षण करताना त्यांना अनेक संकटांना तोंड द्यावं लागे. गाडी नवी मिळाली तरी रस्ते कच्चेच होते. पावसाची एक सर येऊन गेली तरी त्या रस्त्यावर चिखलाची राड व्हायची. पावसाळ्यात ओढे नाले पार करताना वॅगन चिखलात रुते. वाळूत फसे. मग बैलगाडीच्या मदतीने तिला खेचून काढावी लागे. या वॅगनसमवेत फावडी, घमेली, तारेच्या जाळ्या हीही हत्यारं ठेवावी लागत. जाळी वाळूवर पसरून वॅगन पुढे न्यावी लागे. सोबत एक सायकलही वागवावी लागे. कारण कुठे आडरानात वॅगन नादुरुस्त झाली तर मनुष्यवस्तीशी संपर्क साधण्यासाठी रात्री-अपरात्री घनदाट जंगलातून चालत निघावं लागे. तो त्रास वाचण्यासाठी सायकल उपयुक्त ठरे.

अशा लवाजम्यासह दऱ्याखोऱ्यांतून, डोंगररानातून, दलदलीतून, रणातून सालिम अली हिंडले. पक्षि-सर्वेक्षणं पार पाडली. पक्षिनिरीक्षणं नोंदवली. त्यांची ही एकांडी शिलेदारी हळूहळू वृत्तपत्रांच्या बातम्यांचाही विषय होऊ लागली. सालिम अली, पक्षिनिरीक्षण, ऋतुबदल या गोष्टी एकमेकांत गुंफल्या गेल्या. 'स्थलांतरित पाहुणे आले का, पावसाळ्याच्या आगमनाची वार्ता आणणारे पक्षी मुंबईत आढळू लागले का' म्हणून त्यांच्याकडे पृच्छा होऊ लागली... सालिम अलींचा उल्लेख 'लिटिल बर्डमॅन ऑफ इंडिया' असा होऊ लागला. भारतातील तीन प्रसिद्ध पक्ष्यांपैकी एक – कावळा, मोर नि सालिम अली – असा लौकिक झाला. एवढंच नव्हे तर त्यांच्या पक्षिनिरीक्षणावर चुटकेही रचले गेले.

पक्ष्यांचा एक थवा पृथ्वी पर्यटनाला निघालाय, प्रवास करता करता तो भारतीय उपखंडावरून चाललाय. त्यातला मार्गदर्शक पर्यटकांना म्हणतोय – 'आता आपण नेमके भारतीय भूप्रदेशावरून उडत आहोत. खाली जरा नीट न्याहाळून पाहा – सालिम अली डोळ्यांना दुर्बीण लावून आपलं निरीक्षण करत असल्याचं दिसेल.'

पक्ष्यांचं वर्तन अभ्यासण्याच्या प्रयत्नात सालिम अलींनी पक्ष्यांच्या स्थलांतराचा अभ्यासही फार पूर्वीपासून सुरू केला होता. त्या दृष्टीने केवलादेवघना हे त्यांचे आवडतं ठिकाण. दरवर्षी करकोचे, बगळे, पाणकावळे, चमचे (हर्विर्मुख), क्रौंच इत्यादी पाणपक्ष्यांच्या विणीचा हंगाम साधून सालिम अली केवलादेवघनात मुक्काम ठोकत. आपल्या सहकाऱ्यांच्या आणि नंतरच्या काळात विद्यार्थ्यांच्याही मदतीने त्यांनी लाखो पक्ष्यांना कडी चढवण्याचा उपक्रम राबवला. स्थलांतर करणाऱ्या पक्ष्यांची स्थानं,

प्रवासमार्ग, आढळ जाणून घेण्यासाठी त्यांच्या पायात बॉ.नॅ.हि. सोसायटीच्या नावाचं कडं चढवण्याचा हा उपक्रम फारच फलदायी ठरला.

स्थलांतरित पक्ष्यांमुळे स्थानिक पक्षिजीवनात कोणते बदल घडून येतात, हे स्थलांतरित पक्षी कुठे कुठे विखुरतात, स्थानिक नि स्थलांतरित यांत संघर्ष होतो का, स्पर्धा असते का, मानवी हस्तक्षेपामुळे पक्ष्यांच्या परंपरागत जीवनात कोणता विक्षेप येतो, पाहुण्या पक्ष्यांना काही अनपेक्षित बदलांस तोंड द्यावं लागतं त्या वेळी त्यांचं वर्तन कसं असतं या व अशा दृष्टिकोनातून सालिम अलींनी अनेक अभ्यास-प्रकल्पांची उभारणी केली. आणि संग्रहालयात बसून साचेबंद अभ्यासक्रम पार पाडत सहण्यापेक्षा असं निरीक्षणातून पक्षिशास्त्र अभ्यासण्याला चालना मिळाल्यावर अनेक तरुण त्याकडे वळले. सालिम अलींच्या प्रयत्नामुळे भारतभर अनेक ठिकाणी पक्षी अभयारण्यं घोषित झाली. केवलादेव-घना, चित्रक, पॉईंट कॅलीमर हरिके लेक...

सालिम अलींचा पक्ष्यांच्या स्थलांतरणाचा अभ्यास एवढा गाढा की जागतिक आरोग्य संघटना (WHO) पक्ष्यांच्या स्थलांतरणबाबतीतील प्रश्नांची उकल करण्याकरता सालिमसाहेबांना पाचारीत असे.

सामान्य लोकांतही या विषयाच्या बाबतीत कशी जागृती झालीय याची प्रचिती १९८६ साली रशियातील चेर्नोबिल अणुभट्टीत स्फोट झाला त्या वेळी आली.

चेर्नोबिल येथील दुर्घटनेमुळे किरणोत्सर्ग किती प्रमाणात झाला, तिथून स्थलांतरण करून भारतात येणाऱ्या पक्ष्यांना त्याची बाधा झालीय का, त्यामुळे भारतीय जनतेला कितपत धोका संभवतो याविषयी शोध घेतला जावा अशी मागणी होऊ लागली. संसदेतही तसे प्रश्न उपस्थित केले.

सोसायटीने पंधरावीस पक्षी केवलादेवघनातून आणून मुंबईच्या BARC कडे तपासणीसाठी पाठवले... त्या पक्ष्यांना किरणोत्सर्ग झाला नसल्याचे निष्पन्न झाले. ही तपासणी सात

खरं तर आधी यांच्या पायात कडं चढवलं पाहिजे म्हणजे मग जगभर आपल्यामागे कुठे कुठे हिंडतात ते समजेल तरी





दिवस चालू होती. नंतर त्या पक्ष्यांना कडी चढवून सोडून दिलं.

पक्ष्यांच्या स्थलांतरणाइतकंच दुर्मिळ होत चाललेल्या पक्ष्यांचंही कोडं त्यांना होतं. ही कोडी उकलण्यासाठी ते आयुष्यभर प्रयत्नशील होते.

डोंगरी लावा, जेर्डोनचा कोर्सर, ब्लेविटचा जंगली पिंगुळा आणि गुलाबी डोक्याचं बदक या चार पक्षिजाती भारतातून नामशेष झाल्या असाव्यात अशी भीती व्यक्त केली जायची.

हिमालयात आढळणारा डोंगरी लावा शोधण्यासाठी १९३५ सालापासूनच त्यांनी अनेकदा शोधमोहिमा काढल्या. इंग्लंडच्या म्युझियममधून त्याचा 'नमुना' मागवून अभ्यास केला. १९८६ साली म्हणजे वयाच्या नव्वदीतही त्यांनी त्यासाठी शोध मोहीम आखली... पण डोंगरी लावा काही दिसला नाही.

जेर्डोनच्या कोर्सरने मात्र त्यांची इच्छा पूर्ण केली. त्यांच्याच मार्गदर्शनाखाली तरुण पक्षिशास्त्रज्ञ भारतभूषण ह्याने ही मोहीम हाती घेतली. १२ जाने. १९८६ रोजी त्याला हा पक्षी कुडप्पा जिल्ह्यातल्या लंकामलाई पर्वतराजीच्या पायथ्याशी आढळला. तारेने ही खबर त्याने सालिमसाहेबांना कळवली. ते त्याला पाहायला तिथे जाऊन आले.

ब्लेविटचा जंगली पिंगुळा आणि गुलाबी डोक्याचं बदक ह्या दोन पक्षिजाती आढळल्याची नोंद करायची संधी त्यांना लाभली नाहीच.

उण्यापुऱ्या ऐंशी वर्षांच्या पक्षिनिरीक्षणात, सर्वेक्षणात एकही पक्षिजात आपल्या खात्यावर मांडण्याचं भाग्य सालिम अलींना लाभलं नाही खरं, पण पुढे त्यांच्याच हाताखाली शिकून तयार झालेल्या त्यांच्या विद्यार्थ्यांनी वर्गीकरणात काही पक्षिउपजातींना 'सालिमाली' नावे नोंदवलं, हा लाभ भारतीय पक्षिशास्त्राच्या दृष्टीने मोलाचा.

'फिन्नची बाया सुगरण' नामशेष झालेली नाही हे सालिम अलींच्या शोध मोहिमेमुळेच सिद्ध झाले आणि ही पक्षी जात दुर्मिळ, नामशेष झालीय हा समज खोटा ठरला. हिमालयातील 'हनी गाईड' पक्ष्यांची भेट तर त्यांच्या आठवणीतलं तजेलदार पीस.

१९७३ साली वयाच्या सत्त्याहत्तराव्या वर्षी ते भूतानच्या पक्षि-सर्वेक्षण मोहिमेवर होते. सोबत होते एस.ए. हुसेन, अमेरिकेचे पक्षिशास्त्रज्ञ डॉ. रिप्ली. कोसिल्लाच्या लष्करी तळावर त्यांच्या मुक्कामाची सोय होती. आतापावेतो सालिम अली जागतिक कीर्तीचे पक्षितज्ज्ञ म्हणून ख्याती पावलेले. त्यांच्या मोहिमांना सरकारी सहकार्य लाभू लागलेलं. त्यामुळे या मोहिमेचा थाट सगळा लष्करी होता.

या मुक्कामात सकाळच्या न्याहारीला थाळीत जंगली मध वाढून आला तेव्हा सालिम अलींनी प्रवृत्ति-धर्मानुसार कुतूहलाने त्या मधाची चौकशी केली. या मधाच्या संदर्भात 'हनी गाईड' पक्ष्यांचा उल्लेख होताच त्यांनी कान टवकारले.

कोसिल्लापासून १३२ किलोमीटर्सवर बसासिया खेडे. त्याच्या अलीकडे दहा



किलोमीटर्सवर 'मधाचा खडक' असून त्यावर तीस एक जिवंत पोळी लटकत असल्याची माहिती छावणीप्रमुख मे. छड्डांनी पुरवली.

दुसऱ्या दिवशी पहाटेच पक्षितज्ज्ञांच्या स्वाऱ्या त्या खडकाच्या दिशेने रवाना झाल्या. डोंगर वळणं, घाट पार करत प्रवास चालू होता. मधाच्या खडकापाशी पोचण्याआधीच एका वळणावर वृद्ध सालिम अली उद्‌गारले, 'हनी गाईड!'

रस्त्याच्या कडेने उडणाऱ्या दोन इवल्या पक्ष्यांना सालिम अलींनी नजरेनं टिपलं होतं. त्यांनी यापूर्वी हनी गाईड पाहिले नव्हते पण त्यांची वर्णनं वाचली होती. या पक्ष्यांची बुडं नारिंगी रंगाची असतात ही त्यांची महत्त्वाची खूण सालिम अलींच्या डोळ्यांनी नेमकी हेरली.

मधाचा खडक आला. पन्नास फूट उंच आणि शंभर फूट रुंद. उघडाबोडका खडक. रस्त्यावर पुढे झुकल्यासारखा. त्यावर पंचवीस-तीस जिवंत पोळी... एका कडेला वीस-पंचवीस हनी गाईड्स एकमेकांचा पाठलाग करत होते.

लागलीच सालिम अलींनी आपल्या शर्टच्या खिशातून छोटी नोंदवही नि पेन्सिल काढली, भराभरा नोंदी घेतल्या.

ही पक्षिजात दुर्मिळ झालीय अशी समजूत होती. ती चुकीची ठरली. या पक्ष्यांविषयी अधिक जाणून घेण्यासाठी सालिम अली नंतरही दोन-तीन वेळा या परिसरात जाऊन आले. वयाच्या ऐंशीव्या वर्षीही त्या डोंगराळ खडकाळ प्रदेशात रोज सात-आठ मैलांची पायपीट केली. भारतात केवळ हिमालयात आढळणारी ही पक्षिजात. तिला उपेक्षित, अनुल्लेखित कशी ठेवायची, म्हणून त्याही वयात त्यांची धडपड.

या पक्ष्यांचं अगदी जवळून दर्शन घडावं म्हणून दोरखंडाच्या आधारानं तो कडा मागच्या अंगानं चढून जायचं मंडळींनी ठरवलं. सालिमसाहेब अर्थातच सर्वांत पुढे. आणि नुसतं हात हलवत तरी कसं जायचं म्हणून एक दोरखंड स्वत:च्या खांद्यावरून वाहूनही नेला.

या अभ्यास मोहिमेत एका विचित्र अपघातातून ते बचावले. त्यांची जीप घाट रस्त्यावरून चालली होती. रस्ता होता चढणीचा. एका अंगाला सरळ खोल दरी तर दुसऱ्या अंगाला सरळ उभा कडा. तशात जीपचे ब्रेक निकामी झाले. जीप मागे मागे घसरू लागली. ड्रायव्हर भांबावला. काय करावे ते त्याला उमजेना. प्रसंगावधान राखून सालिम अलींनी त्या चालत्या जीपमधून कड्याच्या अंगाला उडी मारली. आपलं शरीर पक्ष्यासारखं अलगद दोन पायांवर सावरलं. सोबतचे हुसेनसाहेब उडी मारताना थोडे गडगडले. खरचटले. त्यांची धडपड समोर उभे राहून मिस्कीलपणे सालिमसाहेब पहात होते.

काळ्या मानेच्या सारस पक्ष्यासाठीही त्यांनी अशीच कष्टप्रद मोहीम १९७६ साली





आखली. त्या वर्षी जाग वन्य. निधी आणि सोसायटी यांनी तिबेटातील या पक्ष्यांसाठी संयुक्तपणे अभ्यास मोहीम हाती घेतली. अर्थात सूत्रधार होते सालिम अली.

दुर्मिळ होत चाललेली ही पक्षिजात नामशेष होते की काय अशी भीती जगभरचे पक्षितज्ज्ञ व्यक्त करू लागले. त्या पक्ष्यांना वाचवण्यासाठी उपाययोजना आखण्यासाठी ही पक्षि-मोहीम होती.

याही मोहिमेत सालिम अली हजारो फूट उंचीवर गेले. हिम नदी फोडून काढलेला रस्ता पार केला. दाट धुकं, बोचरा थंडगार वारा, जिकिरीचा प्रवास... सारं झेपवत त्यांनी प्रवास केला.

या मोहिमेत त्यांची काळजी वाहण्यासाठी भारत सरकारने एका डॉक्टरची खास नेमणूक केली होती नि एक रुग्णवाहिका मदतीस ठेवली होती. त्या रुग्णवाहिकेत प्राणवायूचं एक नळकांडंही होतं. पण त्याचा उपयोग सालिम अलींना कधीच करावा लागला नाही.

सालिम अली एखाद्या लहान मुलाच्या उत्सुकतेने तो लष्करी इतमाम पाहत होते. अनुभवत होते. लष्करी पद्धतीने प्रवासाची आखणी नि रंगीत तालीम व्हायची तीही आपल्या कॅमेऱ्याने टिपायचे.

लडाखपर्यंतचा प्रवास अतिश्रमाचा. पण जवानांच्या हृद्य स्वागताने श्रमपरिहार व्हायचा. या वृद्ध ऋषितुल्य शास्त्रज्ञाकडे तिथले जवान कौतुकमिश्रित आदराने पाहायचे. त्यांचे स्वागत करायचे. खास खाना द्यायचे. सालिम अलींचं सौजन्यपूर्ण वागणं-बोलणं, नर्म विनोद त्यांना आकृष्ट करी. हजारो फूट उंचीवर, तिथल्या हवामानाला दाद न देता, तरुणालाही मागे पाडणाऱ्या चालीनं त्यांना तिथे वावरताना पाहून साऱ्यांना अचंबा वाटे.

सारस पक्ष्यांची वस्ती जवळ आल्यावर सालिमसाहेबांनी स्थानिक वेश धारण केला. सारस पक्ष्यांशी जवळीक साधण्यासाठी त्यांनी ही खबरदारी घेतली.

हान्लेला पोचल्यावर त्यांचे सहकारी डोळ्यांवर दुर्बिणी चढवून परिसर न्याहाळू लागले. एकाच्या तोंडून हर्षोद्‌गार निघाला 'क्रेन! क्रेन!' ते ऐकताच सालिम अलींचा आनंद गगनात मावेना.

काळ्या मानेच्या सारसाच्या दर्शनाने ती कष्टप्रद मोहीम सफल झाली. ती पक्षियात्रा आनंददायी ठरली.



# घेतला वसा

पक्षिनिरीक्षणाबरोबरच सालिम अलींचा पर्यावरणाचा अभ्यासही चालू होता. निसर्ग संरक्षणासाठी, प्राणिसृष्टीचा संहार थांबविण्यासाठी १९३०-३२ पासूनच प्रयत्नशील होते.

प्राण्यांची बेहिशोबी हत्या होतेय याची खंत त्यांनी १९३० सालच्या हैदराबाद संस्थान पक्षि-सर्वेक्षणाच्या वेळी व्यक्त केली होती. त्यांनी सोसायटीच्या जर्नलमधून 'हैदराबाद स्टेट वाईल्ड लाईफ प्रिझर्वेशन' ह्या लेखातून आपले विचार व्यक्त केले. तिथल्या जंगलातून वन्य प्राण्यांची मोठ्या प्रमाणावर शिकार होत असल्याचं सर्वेक्षणाच्या वेळी त्यांच्या ध्यानी आलं. त्या लेखात ते शेवटी म्हणतात, 'नुसते कायदे करून भागणार नाही. लोकमत जागृतीची आवश्यकता आहे... त्यासाठी व्याख्यानं, फिल्म्स, स्लाईडसद्वारा वन्य प्राण्यांचं महत्त्व पटवून दिलं पाहिजं... शालेय जीवनापासूनच ही जाणीव निर्माण व्हायला हवी... मगच त्यांना वन्यप्राणी जतन करणं ही आपलीच जबाबदारी आहे याची जाणीव होईल.'

निसर्गप्रेमी प्राणिमित्र कर्नल बर्टन, ई.पी.गी, सालिम अली यांनी वनस्पती आणि





प्राणिजीवन संवर्धनासाठी लोकमत जागृत करण्याच्या हेतूने लेख, पत्रकं, व्याख्यानं यांचा मारा तर केलाच पण शासनाकडेही वारंवार निवेदनं पाठवली. १९५२ साली 'इंडिया बोर्ड ऑफ वाईल्ड लाईफ' स्थापन होण्यात या त्रिमूर्तीचा वाटा मोठा. बोर्डाच्या स्थापनेपासूनच सालिम अली त्याचे आजीव सदस्य होते.

पक्षी, प्राण्यांच्या शिकारीला त्यांचा विरोध भूतदयेपोटी वा अहिंसेपोटी नव्हता. त्या विषयीची त्यांची मतं अतिशय स्पष्ट होती. 'मुद्दल सुरक्षित ठेवून व्याज उपभोगावे' असं ते म्हणत. एवढंच नव्हे तर फळबागांवर तुटून पडणाऱ्या, त्या उद्ध्वस्त करणाऱ्या राघूंचा बंदोबस्त करायला हवा असंही ते आवर्जून सांगत. 'त्यांची उत्तम तंदुरी बनवा अन् लोकप्रिय करा म्हणजे त्यांच्या संख्येवर नियंत्रण तरी येईल' असंही ते सुचवत.

प्राणिशास्त्रातील अभ्यासक्रमाचा भाग म्हणून पक्षि-शरीर-विज्ञानाच्या अभ्यासासाठी किंवा प्राणिसंग्रहालयीन अभ्यासक्रमासाठी आवश्यक म्हणून नमुन्यांची देवाण-घेवाण करावी लागते त्यासाठी प्राणी, पक्षी मारणं वेगळं आणि तारांकित हॉटेलांच्या मेनूत भर घालण्यासाठी लावे, कवडे, तितर मारणं वेगळं असं ते नेहमी सांगत. प्राण्या-पक्ष्यांचा व्यापार तर त्यांना कधीच मंजूर नव्हता.

पक्षि-नमुना संग्रहालय समृद्ध करण्यासाठी, पक्षिशास्त्र अभ्यासकांच्या सोयीसाठी सुरुवातीच्या काळात सालिम अलींनी हजारोंच्या संख्येने पक्षी टिपले. नमुने तयार केले. मात्र पक्षी टिपतानाही त्यांचा एक स्वतंत्र दृष्टिकोन होता. त्यांचे मित्र लोक वान थो यांनी आपल्या रोजनिशीत तो विचार नोंदवलाय... 'उडत असणाऱ्या पक्ष्याला टिपण्यात खरं कसब आहे हे मान्य; पण ते उचित नाही असे सालिम म्हणतो. कारण उडत असणारा पक्षी नुसता जखमी होण्याचीच शक्यता अधिक. अशा पक्ष्याला तात्काळ मृत्यूही येत नाही. तो तसाच दूरवर उडत जातो नि खंगून खंगून मरतो. त्यापेक्षा बसलेला पक्षी टिपावा. म्हणजे तो हमखास तात्काळ मरतो. मग अशा शिकारीत उत्कंठा, मजा नि रोमहर्षकता नसेना का!' आणि नमुन्यासाठी असे पक्षी टिपताना 'आपण खुनी आहोत की काय असं वाटू लागतं' ही त्यांची खंतही लोक वान थो नोंदवून ठेवतात.

त्यांचं पक्षिप्रेम, प्राणिमात्राविषयीची आस्था ही केवळ भाबड्या भूतदयेपोटी नव्हती. पर्यावरणाचं, निसर्गाचं संतुलन राखण्यासाठी, ही पृथ्वी माणसाला जगण्यायोग्य ठरण्यासाठी निसर्गातील सर्वच घटक महत्त्वाचे असतात, नितान्त आवश्यक असतात म्हणून प्राण्यांच्या बेहिशोबी हत्येला त्यांचा विरोध होता. आणि जंगलतोडीलाही. निसर्गसंरक्षण चळवळ सुरू करून तिला त्यांनी वाहूनच घेतलं होतं.

निरनिराळ्या प्रकल्प उभारणीपायी जंगलतोड मोठ्या प्रमाणावर होऊ लागल्यानं परिसंस्था नष्ट होऊ लागल्यात, अनेक पक्षिजाती नामशेष झाल्यात याचं अतीव दुःख होतं.



१९३०-३५ सालांत पक्षि-सर्वेक्षणाच्या निमित्ताने ते केरळच्या घनदाट सदाहरित जंगलांतून अनेकदा भटकले. ती जंगलं त्याच्या विशेष आवडीची. तिथल्या वनश्रीनं त्यांना मोहूनच टाकलं होतं. पण नंतरच्या काळात मानवी आक्रमण तिथं झालं. जंगलतोड होऊ लागली. हजारो एकर जमीन विद्रूप झाली हे पाहून त्यांचा जीव कळवळे. अयन वृत्तावरची हरितसृष्टी, जंगलं नष्ट होत चालल्याची भीती ते वारंवार बोलून दाखवत.

'सायलेंट व्हॅली' रक्षणासाठी त्यांनी १९७७-७८ च्या कालावधीत जी धडपड केली, धावपळ केली त्यामुळे ते ठिकाण अबाधित राहिलं हे जितकं महत्त्वाचं तितकंच किंवा त्याहूनही अधिक महत्त्वाचं म्हणजे लोकमानसात तो विचार रुजू लागल्याचं दिसू लागलं. सायलेंट व्हॅलीरक्षणात निसर्गप्रेमी जनतेने त्यांच्या प्रयत्नांना ठाम नि खंबीर पाठिंबा दिला.

'सायलेंट व्हॅली विद्युत्‌निर्मिती प्रकल्पा'विरुद्धची आपली भूमिका पंतप्रधान चौधरी चरणसिंग यांच्यासमोर मांडण्यासाठी सालिम अली आपल्या सहकाऱ्यांसह दिल्लीला गेले. या वेळी त्यांचं वय होतं ब्याऐंशी.

पंतप्रधानांना सायलेंट व्हॅली हे प्रकरण काय हेच मुळी माहीत नव्हतं. मग उपस्थित असलेल्या एका अधिकाऱ्याने स्मरण दिलं – 'काल मलायाहून निसर्गप्रेमी संघटनेचं ज्या प्रकरणी पत्र आलंय तीच ही सायलेंट व्हॅली.'

आदल्या दिवशीच मलायाहून एका निसर्गप्रेमी संघटनेचं 'सायलेंट व्हॅली वाचवा' अशी विनंती करणारं पत्र पंतप्रधानांना आलं होतं. त्याचा संदर्भ अधिकाऱ्यांनी दिल्यावर पंतप्रधानांना खुलासा झाला. पण त्यापायी या वृद्ध शास्त्रज्ञाने मुंबईहून दिल्लीला का यावं ते त्यांना उमजेना.

'आपण त्यासाठी एवढे कष्ट का घेतलेत?'

'फार दुःख होतंय म्हणून!'

'पण या प्रकल्पाला तुमचा एवढा विरोध का?'

'सायलेंट व्हॅली एकदा नष्ट झाली तर ती पुन्हा नव्याने तशीच उभारता येणार नाही. तिथल्या वनस्पती, प्राणी, पक्षी कोणत्याही मार्गाने पुन्हा निर्माण करता येणार नाहीत. तिथली परिसंस्था, तिथलं पर्यावरण यांचं काय?... एकवेळ ताजमहाल नष्ट झाला तर तो पुन्हा नव्यानं उभा करता येईल पण सायलेंट व्हॅली नाही–!'

'कोण म्हणतो आम्ही ताजमहाल नष्ट करणार आहोत?'

'!'

मंडळी मुंबईला परतली.

त्याच सुमारास जनता सरकारची राजवट डबघाईला आली... निवडणुका येऊ





घातल्या... सत्तास्पर्धेच्या कल्लोळात सायलेंट व्हॅली प्रकरण बाजूला पडणार की काय असं वाटू लागलं.

सालिम अली, बॉम्बे बचावचे किसन मेहता, थिऑसफिकल सोसायटीच्या रुक्मिणी अरुंडेल, चिपको आंदोलनप्रणेते सुंदरलाल बहुगुणा, फ्रेंड्स ऑफ ट्रीजचे जोसेफ जॉन, जागतिक वन्य निधीचे एस.पी. गोदरेज आदींनी संयुक्तपणे एक जाहीर आवाहनपत्रक काढलं – 'अ डिक्लरेशन ऑफ पॉलिसी ऑन इंडियाज् इन्विरनमेंट ॲण्ड इकॉलॉजी.' भारतातील पर्यावरण, परिसंस्था, निसर्गाचं सुस्थापन या बाबींचा अंतर्भाव राजकीय पक्षांनी आपल्या जाहीरनाम्यात करावा असं आवाहन केलं.

पंतप्रधान इंदिरा गांधींनी त्या निवडणुकीत आपल्या जाहीरनाम्यात पर्यावरण रक्षणाचा मुद्दा अंतर्भूत केला आणि निवडून आल्यावर त्यांनी त्याबाबत कार्यवाहीही केली.

'सायलेंट व्हॅली वाचवा' आणि तत्सम आंदोलनांतून निसर्ग संरक्षण आणि सुस्थापन यांना कायदेशीर आधार मिळवून देण्याचे विचार सुरू झाले. सोसायटीच्या जुलै-सप्टें. १९७९ च्या 'हॉर्नबिल' अंकाच्या संपादकीयात सालिम अली लिहितात – '...या पासून आपण धडा घेऊ या. यापुढे निसर्ग संरक्षण चळवळ ही एक वेगळी बाब म्हणून तेवढ्यापुरता विचार मांडून चालणार नाही. अशा प्रकल्पाच्या योजना तयार करण्यापूर्वी अनेक साधकबाधक गोष्टींचा खोलवर विचार करून, विविध क्षेत्रांतील तज्ज्ञांचा सल्ला घेऊन, कारणमीमांसा करून मगच ठाम भूमिका घ्यावी लागेल...'

पशुपक्षी राखायचे म्हणून तिथून माणसाला बाहेर हुसकायचे अशा विचारांचा ते पाठपुरावा करत नव्हते. तर माणूस आणि निसर्ग यांत सुसंवाद आणि परस्परपूरकता राखण्याच्या तत्त्वांचा प्रसार ते करत होते. अशा विचारांना प्राधान्य देणाऱ्या 'सह्याद्री बचाव', 'बॉम्बे बचाव' चळवळींना त्यांचा पूर्ण पाठिंबा होता.

मानवी जीवन सुसह्य करण्यासाठी, वाढत्या लोकसंख्येची गरज म्हणून, देशाच्या विकासाचा भाग म्हणून निरनिराळे प्रकल्प उभारणं अगत्याचे असतं. परंतु अशा प्रयत्नात निसर्गाचा तोल जाईल अशी उलथापालथ करू नये असं त्यांचं कळकळीचं सांगणे असे. 'युरोपियन राष्ट्रांत किंवा इंग्लंडात बेलगाम औद्योगीकरणामुळे प्रदूषणाचा धोका वाढलाय... आपण त्या बाबतीत पिछाडीवर आहोत. वेळीच काळजी घेऊन तो धोका टाळू शकतो. सध्या जास्त धोका आहे तो आपला अडाणी शेतकरी प्रमाणाबाहेर जंतुनाशके फवारतोय त्याचा' अशा इशाराही ते वारंवार देत.

भारतातील सर्व समस्यांचे मूळ म्हणजे प्रचंड वेगाने वाढणारी लोकसंख्या. तिच्यावरच आधी आळा घातला पाहिजे, त्यासाठी कठोर उपाय योजले पाहिजेत असं त्यांचं परखड मत. पण उच्च राजकीय वर्तुळातही याविषयीची उदासीनताच त्यांना जाणवली. एका राजकीय संताने 'ब्रह्मचर्यपालनाखेरीज लोकसंख्येला आवर बसणार नाही' असं त्यांना



ऐकवल्यावर ते पुन्हा कधी त्यांच्या नादाला लागले नाहीत. अशांचे प्रबोधन करत बसण्याची सवडही त्यांना नव्हती.

निसर्ग संरक्षण चळवळ त्यांनीच भारतात जन्माला घातली आणि त्यासाठी तन-मन-धनाने वाहून घेतलं. आयुष्यभर तिचा पाठपुरावा केला.

सालिम अलींच्या निसर्गविषयक ज्ञानाची, अभ्यासाची दखल आंतरराष्ट्रीय पातळीवर घेतली गेली. अनेक राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय निसर्गसंरक्षण, वन्यप्राणि संरक्षण समित्यांचे ते सदस्य होते. याविषयी जागतिक स्तरावर योजना, उपक्रम आखणाऱ्या परिषदांत त्यांचा समावेश असे.

१९७६ साली त्यांना नोबेल पारितोषिकाच्या तोडीचं अमेरिकेचं पॉल गेट्टी पारितोषिक लाभलं. त्याद्वारे त्यांना पन्नास हजार डॉलर्स म्हणजे चार लाख रुपये मिळाले. ती सर्व रक्कम वापरून त्यांनी 'सालिम अली निसर्ग संरक्षण निधी' उभारला. सोसायटीत संशोधन प्रकल्प अध्यासन सुरू केले.

सामान्य जनतेला निसर्ग संरक्षणाचं महत्त्व पटवून देण्यासाठी दृक्-श्राव्य माध्यमाद्वारे, प्रसारमाध्यमाद्वारे प्रबोधन करण्यासाठी अनेक योजनांना आवश्यक ती साधने या निधीतून उपलब्ध झाली.

सालिम अलींच्या प्रेरणेमुळे, प्रोत्साहनामुळे, निरंतर आवाहनामुळे भारतात ठिकठिकाणी निसर्ग अभ्यास मंडळे, पक्षिनिरीक्षण मंडळ, वृक्षमित्र संघटना उभ्या राहिल्या. अशा मंडळांच्या उद्घाटनांना, समारंभांना सालिम अली आवर्जून उपस्थित असत. जनसामान्यांत निसर्ग संरक्षणाची जाणीव निर्माण करण्याची प्रत्येक संधी त्यांनी साधली.

भारतातील अभयारण्यं ही त्यांची देशाला सर्वांत अनमोल देणगी. पक्षिनिरीक्षणासाठी ते ज्या ज्या ठिकाणी हिंडले त्या त्या ठिकाणी त्यांनी निसर्ग संरक्षणाचा, प्राणिसृष्टी जतनाचा आग्रह धरला. अनेक ठिकाणी अभयारण्यं घोषित झाली ती त्यांच्या प्रयत्नांमुळेच.

सुरुवातीच्या काळात निसर्ग संरक्षणाच्या बाबतीत सालिम अलींचा आवाज एकाकी नि अस्फुट होता. पण म्हणून हार मानून ते कधीच थांबले नाहीत. एकांड्या शिलेदारासारखे पुढे जातच राहिले. त्यांचा विचार मूळ धरत गेला तसा समविचारी परिवारही वाढला. अस्फुट आवाज बुलंद होत गेला. त्यामुळेच तर सायलेंट व्हॅली प्रकल्पाला खीळ बसू शकली.

सायलेंट व्हॅलीसारख्या घटना पुन्हा पुन्हा घडू नयेत, त्यावर काही नियंत्रण असावं, लोकमताचा दबाव असावा, शास्त्रीय ज्ञानाचा अंकुश असावा या दृष्टीने कायम स्वरूपाची एखादी योजना असावी यासाठी पर्यावरण खातं निर्माण करावं असा आग्रह त्यांनी केंद्रसरकारकडे धरला. अनेक निसर्गवेत्त्यांनी, पर्यावरण तज्ज्ञांनी त्या आग्रहाचा पाठपुरावा केला. भारत सरकारने त्या मागणीचं महत्त्व ध्यानी घेऊन पर्यावरण खातं निर्माण केलं.





आयुष्याच्या अखेरीस ते म्हणत – 'मी आयुष्यभर पक्षी-प्राणी-निसर्ग वाचवण्याचा यथाशक्ति प्रयत्न केला. कोणतीही तडजोड न करता कर्तव्य बजावलं. आता तरुणांनी पुढं यावं. माझ्यावर काही लिहिण्या-बोलण्यापेक्षा माझ्या कामाचा वारसा पुढे चालू ठेवावा.'

पक्षी वाचवा, प्राणी जगवा अशा घोषणा देत सालिम अली पक्षिनिरीक्षणाकडे वळले नव्हते. पक्षिनिरीक्षण हा त्यांचा छंद होता. त्या छंदातून अभ्यास घडला. अभ्यासाचा व्यासंग झाला.

भारतीय पक्षिशास्त्राची बाल्यावस्था संपून ते प्रौढावस्थेत आलं ते सालिम अलींच्या व्यासंगामुळे. सालिम अलींनी पक्षिशास्त्राला संग्रहालयाच्या चौकटीतून बाहेर काढलं. त्याला वर्तनशास्त्राच्या अभ्यासाचा आधार दिला. परिसंस्था, पर्यावरण यांच्या अभ्यासाची जोड दिली.

प्रसिद्ध जीवशास्त्रज्ञ जे.बी.एस. हलडेन आपल्या व्याख्यानात नेहमी सालिम अलींची वाखाणणी करत. म्हणत '...पेन्सिल, कागद, संयम आणि दुर्बीण एवढ्याच साधनांनिशी सालिम अलींनी भारतीय पक्षिविज्ञानाची जोपासना केली. त्याला मजबुती आणली.'

हजार बाराशे पक्षिनिरीक्षकांतून एखादा सालिम अली घडला तरी त्याला पक्षिविज्ञान दुवाच देईल असं म्हटलं जातं ते यासाठीच!

पंखवाल्यांचा मागोवा बिनपंखवाल्याने घ्यायचा म्हणजे सोपी गोष्ट नव्हे. त्यासाठी भरपूर चिकाटी हवी. धीर हवा, जबरदस्त इच्छाशक्ती हवी. आणि आपण करत आहोत त्यावर असीम निष्ठाही हवी. या साऱ्यांचा मिलाफ सालिम अलींच्या स्वभावात होता म्हणून तर ते 'सालिम' होते.

पक्षिप्रेमापायीच त्यांनी चाकरमानी व्हायचं टाळलं. 'गरजेच्या काळात आपल्याला नोकरी मिळाली नाही ते एका अर्थी बरंच झालं' असे ते पुढं नेहमी म्हणत आणि भारतीय पक्षिशास्त्रही त्याबाबत सहमत आहे!

विसाव्या शतकाच्या सुरुवातीपर्यंत प्राणिशास्त्राच्या दृष्टीने पक्षिनिरीक्षण हे ऐदी आणि आळशी श्रीमंताचं वेळ घालवण्याचं साधन होतं. त्यातल्या त्यात मान्यता होती ती पक्षि-नमुने आणि अंडी गोळा करण्याला. पक्षिनमुना संग्रहाला नि वर्गीकरणाला त्याची मदत व्हायची. पक्षिविज्ञानाची ही एवढी मर्यादित व्याप्ती. पण सालिम अलींना आपला छंद, अभ्यास अशा चौकटीत बद्ध करायचा नव्हता. वर्गीकरण, सूचीकरण या पायऱ्या ओलांडून पुढं जायचं होतं.

समाजमान्य अभ्यासासाठी प्रेरणा, प्रोत्साहन मिळत असतं. परंतु सालिम अलींनी तारुण्यात हा वसा हाती घेतला तेव्हा त्याला समाजमान्यता तर नव्हतीच उलट वेडाचार म्हणून त्याची उपेक्षाच होती. आस्था वाटणं तर फार दूरची गोष्ट. अशा परिस्थितीत



आर्थिक अडचणींची पर्वा न करता, स्वत:च्या गरजा वाढू न देता त्यांनी स्वत:ला पक्षि-अभ्यासाला वाहून घेतलं. यशाचं त्रैराशिक मांडून रुपये आणे पैंत उत्तर शोधत न बसता एका वेगळ्याच मार्गानं ते निघाले. त्या वेळी त्यांना खरी साथ दिली ती त्यांच्या पत्नीने– तेहमिनाने. आणि त्यांच्या वडील बंधूंनी – हमीदभाईंनी. या दोघांच्या सहकार्याबद्दल, प्रोत्साहनाबद्दल सालिम अली नेहमीच कृतज्ञता व्यक्त करीत.

सालिमसाहेबांचे मामा अब्बास तय्यबजी यांना मात्र आपल्या भाच्याचा हा छांदिष्टपणा पसंत नव्हता. व्यवस्थित नोकरीधंदा करावा, जबाबदारीने गृहस्थी चालवावी ते टाळून सालिमने ही पळवाट शोधलीय, आपला आळस झाकण्यासाठी सबब पुढे केलीय असं वाटे. अब्बास तय्यबजी १९३६ साली वारले. त्यांना आपलं मत बदलण्याची संधी मिळाली नाही.

ब्रिटिश पक्षितज्ज्ञ, पक्षिनिरीक्षक स्वातंत्र्योत्तर काळात भारत सोडून गेले. अशा वेळी भारतीय पक्षिशास्त्राचा अभ्यास खंडित होऊ न देता तो पुढे चालू ठेवण्याची, त्याची प्रतिष्ठा वाढवण्याची आणि त्याला लोकमान्यता, लोकप्रियता मिळवून देण्याची कामगिरी सालिम अलींनी निष्ठापूर्वक पार पाडली. पक्षिशास्त्रात सतत नवीन भर टाकत राहिले.

त्यांच्यात लपलेल्या त्या छोट्या पक्ष्यानं जीवघेण्या यांत्रिकीकरणाच्या चक्रात गरगरण्यापेक्षा दूर जंगलात, निरागस निसर्गात वावरणं पसंत केलं. आपल्या या वर्तनाविषयी ते गमतीनं डोळे मिचकावून म्हणत – 'हवं तर याला तुम्ही पलायनवाद म्हणा.'

सालिम अलींना पक्ष्यांच्या मृत कलेवरांच्या अभ्यासापेक्षा खरी ओढ जिवंत पक्ष्यांची. '...पक्ष्यांच्या पिसांचं सौंदर्य, त्यांची किलबिल यांची मोहिनी माझ्या मनावर नेहमीच पडते. निसर्गसान्निध्यात मुक्तपणे संचारणाऱ्या पक्ष्यांना निरखणं विलक्षण सुखदायक, आल्हाददायक असतं...' असं ते नेहमी म्हणत.

त्यांच्या अभ्यासपद्धतीत निरीक्षणाला अनन्यसाधारण महत्त्व. '... पक्षिशास्त्राच्या अभ्यासाची पहिली नि अटळ पायरी म्हणजे पक्षि-निरीक्षण... पक्षि-निरीक्षणाला जाल तेव्हा प्रत्येक खेपेस तुम्हाला नवा पक्षी भेटेलच असेही नाही आणि तसा हेकाही कोणी धरू नये. नेहमीच्याच आढळातील कावळा-चिमणीसारखा पक्षीही एखादा नवा पैलू दाखवून जातो. त्याची नोंद घेणं महत्त्वाचं...' असं ते आग्रहपूर्वक सांगत, रोजचा कावळा देखील ते नव्याने पाहत! भारतीय कावळ्याविषयी सांगोपांग परिपूर्ण माहिती देणारा अन्य पक्षिशास्त्रज्ञ सापडणं कठीण.

'...पक्ष्यांच्या नुसत्या शिळेवरून ते (सालिम अली) प्रत्येक पक्षी ओळखतात ही त्यांची क्षमता विलक्षणच म्हणायची. घनदाट पर्णराजीत जराही हालचाल न करता स्तब्ध बसलेला पक्षीही ते नजरेनं टिपत. मला याचं नेहमीच आश्चर्य वाटे. अशा ठिकाणी बसलेला पक्षी नजरेनं हेरायला खास नजरच हवी. ती सालिम अलींकडे आहे. असा पक्षी





माझ्या नजरेस कधीच येत नाही...' सुप्रसिद्ध पक्षितज्ज्ञ होरास ॲलेक्झांडर यांनी त्यांना चाळीस वर्षांपूर्वी दिलेली ही दाद.

पक्ष्यांविषयीचं त्यांचं कुतूहल चिरतरुण. अगदी अलीकडची गोष्ट. नवेगाव बांधच्या शेतकऱ्यांनी जुनी झाडं कापली. त्यामुळे तिथल्या काणूक पक्ष्यांना ढोली मिळेनात. म्हणून मग तिथले वनरक्षक मारुती चितमपल्ली यांच्या मदतीने त्यांनी काणूकांची सोय केली. साध्या खोक्यापासून पाचशे कृत्रिम घरटी करून घेतली. ती घरटी उंच झाडांवर साठ एक फूट उंचावर ठेवायला सांगितली.

पक्ष्यांनी त्या घरट्यांत अंडी घातली. उबवली. एका एका घरट्यात चौदाचौदा पिल्लं. एवढ्या उंचावरून ही पिल्लं जमिनीवर कशी उतरतात याचं सालिम अलींना कुतूहल. त्यांनी मारुती चितमपल्लींना याविषयीची निरीक्षणं कळवायला सांगितली.

नावीन्याचा, जाणून घेण्याचा त्यांचा ध्यास कधी विरला नाही. कोणी पक्षिविज्ञानावर मराठीत काही लिहिलं आणि त्यांना ते पाठवलं की जाणकाराकडून त्याचा अनुवाद करून घेत. समजून घेत. कौतुकाची पावती देत. नव्वदीच्या उंबरठ्यावर असतानाही आपलं ज्ञान अद्ययावत् ठेवण्यासाठी गळ्यात कॅमेरा अडकवून भर दुपारी कुठेही चालू पडण्याची त्यांची तयारी असे. त्यांची जिज्ञासा वयाच्या नवव्या वर्षाइतकीच नव्वदीतही कायम होती. त्यामुळेच तर पक्षिजगत त्यांच्या जिभेवर बसलं होतं.

आणि असं होतं तरीही पक्ष्यांबाबत कोणताही निष्कर्ष मांडताना, नवा विचार मांडताना कधी घाई केली नाही की उतावळेपणा दाखवला नाही. अगदी नजरेसमोरच्या गोष्टींवरही ते चटकन विश्वासत नसत.

भूतानमधील एका मोहिमेतली गोष्ट. पक्षिनिरीक्षण करत असताना लाँग टेल्ड सिबिआंचा एक थवा समोर येऊन उतरला. या पक्ष्यांच्या पंखांवर पांढरे ठिपके असतात अशी आजवरची नोंद. पण हा थवा पाहून सालिम अली आश्चर्यचकित झाले. कारण या पक्ष्यांच्या मस्तकावरही ठिपके दिसत होते... ही खूण सालिम अलींना पटेना... पुन्हा पुन्हा त्यांनी तो थवा दुर्बिणीतून न्याहाळला.

या वेळी त्यांच्यासोबत होते त्यांचे भाचेजावई झफर फतेहअली. झफरना वाटलं – एक नवी पक्षिजात आपल्याला आढळलीय, आजवर नोंद न झालेल्या पक्षिजातीचा शोध लागलाय असं सालिम अलींनी जाहीर करायला हरकत नाही... पण नाही. त्यांना सालिम अलींनी सबुरीचा सल्ला दिला. एवढी चांगली संधी पुढ्यात आपणहून चालत आलीय तरी सालिम अली ती वाया का दवडताहेत यानं कोडं झफरना पडलं... वैषम्यही वाटलं.

दुसऱ्या दिवशी सालिम अली पुन्हा त्याच स्थळी गेले. त्या थव्यातला एक पक्षी टिपला... आणि रहस्य उलगडलं! त्या पक्ष्यांच्या मस्तकावरचे ठिपके म्हणजे फुलातले परागकण होते.



सालिम अलींनी झफर फतेहअलींना एक इंग्रजी म्हण ऐकवली – 'हातातला एक पक्षी हा झुडूपातील अनेक पक्ष्यांपेक्षा अधिक भरवशाचा असतो, बरं!'

कोणता पक्षी कसा वागतो, कोण कसा खातो यांवरही त्यांचं बारीक लक्ष.

वीस-एक वर्षांपूर्वीचा अनुभव त्यांच्या एका विद्यार्थ्यानेच सांगितलाय. एका पक्षिविषयक पुस्तकात एका छायाचित्रात चार फुलचुखे पक्षी (Flower peckers) एका झुडपावर एकत्र बसलेले दाखवले होते. त्या छायाचित्राखाली सालिम अलींनी लिहिलं – 'फसवे' (fake). त्या विद्यार्थ्याने त्यांना असं का म्हणून विचारले. त्यांनी स्पष्टीकरण दिलं – 'हे पक्षी बसलेले नाहीत, 'बसवलेले' आहेत.' चौकशीअंती सालिम अलींचे अनुमान सत्य ठरले. ते पक्षी पेंढा भरलेले होते. पुस्तककर्त्याने त्यांना झुडपावर एकत्र 'बसवून' त्यांचं छायाचित्र घेतलं होतं. फुलचुखे हे आपल्या वृत्तीप्रमाणे एकएकटे वावरणारे, समूहाने नव्हे.'

पक्ष्यांच्या खानपानाच्या सवयीही त्यांना किती बारकाईने माहीत होत्या याचा अनुभव त्यांच्या दुसऱ्या एका विद्यार्थ्याने नोंदवलाय. या विद्यार्थ्याला पेरूचं वावडं. पेरू खाल्ला की त्याच्या पोटात जळजळे. सालिम अलींना तर पक्ष्यांप्रमाणे प्रत्येक फळ प्रिय. आपला हा विद्यार्थी पेरू खात नाही हे त्यांना समजलं तेव्हा त्यांनी त्याची चौकशी केली नि मग गुरुमंत्र दिला – 'हे बघ, पक्षी जसा पेरू खातो तसा तू खा. बी न फोडता. बीच्या








आतला टॅनिन घटक पोटात जळजळ निर्माण करतो. त्यानं डोकं दुखतं. म्हणून बी फुटू न देता पेरू खा.'

त्या विद्यार्थ्याने गुरूच्या मार्गदर्शनाखाली पेरू खाल्ला... गुरुमंत्राची अनुभूती मिळाली... पुन्हा म्हणून कधी त्याला पेरू नडला नाही.

फार पूर्वी म्हणजे १९५५ च्या सुमारास सालिम अली सिक्कीमचे पक्षि-सर्वेक्षण करत होते. बरोबर होते लोक वान थो. त्या वेळी तिथले पोलिटिकल ऑफिसर होते श्री. अप्पा पंत. या द्वयीला त्यांनी भोजनासाठी पाचारलं. त्या वेळी एक प्रसंग लोक वान थोंनी आपल्या रोजनिशीत नोंदवलाय.

'...अप्पांचा स्वभाव विनोदी. त्यांना सालिमची खिल्ली उडवण्याची लहर आली. ते म्हणाले, 'सौ. पंतांना काही सालिमच्या (इंडियन हिल् बर्ड्स) पुस्तकावरून पर्वतीय पक्षी ओळखता येत नाहीत.'

यावर सालिम चटकन् उत्तरले – 'अस्सं! आता मला पक्ष्यांना नीट पढवलं पाहिजे आणि मी त्यांच्याविषयी काय लिहून ठेवलंय ते जाणवून दिलं पाहिजे.'

काय बिशाद पक्ष्यांची की ते सालिम अलींचं अक्षर ओलांडतील!

सालिम अलींच्या पक्षि-अभ्यासाने त्यांना राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय कीर्ती मिळवून दिली. देशोदेशीचे मानसन्मान लाभले. वृत्तपत्रे-नियतकालिकांतून त्यांच्या मुलाखती झळकू लागल्या. उभी हयात पक्ष्यांमागे फिरणाऱ्या या पक्षिमित्राला, पक्षिशास्त्रज्ञाला जाणून घेण्याची उत्सुकता वार्ताहरांना, मुलाखतकारांना होतीच. ते अनेकदा पक्षिप्रेमावरून सालिम अलींना छेडत.

'...इतकी दशकं पक्षिनिरीक्षण करत आलात त्याचा समाजाला काय लाभ झाला? ...हा तर श्रीमंती छंद. सामान्य नागरिकाचं काय भलं केलं त्यानं?' किंवा '...हा देश उपासमारीनं गांजलेला. पक्षिनिरीक्षण करून काय लोकांची पोटं भरणार आहेत? हे तर भरल्यापोटी वेळ घालवण्याचे चाळे... सैबेरियन क्रेन जगला काय नि मेला काय, त्याचा मानवी जीवनावर काय परिणाम होणार आहे?' त्यांच्या या वा अशा प्रश्नांना सालिम अलींकडे साधार उत्तरे होती.

एक छंद म्हणून आपण पक्षिनिरीक्षणाला सुरुवात केली. सौंदर्यास्वाद हाही हेतू त्यापाठी होता, जंगलं-वनं पायी तुडवण्याची ओढही त्यापाठी होती असं ते नेहमीच सांगत. असं असलं तरी त्यांनी छंदाला शास्त्रीय अभ्यासाची भली भक्कम बैठक दिली



होती. ते म्हणत, 'पक्षिसृष्टी हा जीवसृष्टीतील एक महत्त्वाचा घटक. पक्ष्याची एखादी जात या पृथ्वीतलावरून नष्ट झाली तर त्यामागचे कारण काय याचा शोध घ्यायला हवा. त्याच्या परिसंस्थेत काही दोष निर्माण झालाय का, पर्यावरणाचा तोल ढासळलाय का याचा शोध घ्यायला हवा. अखिल जीवसृष्टी एकाच पर्यावरणात जगत असते, एकमेकांच्या आधाराने जगत असते. असे असताना त्यातील एखादा घटक नष्ट झाला तर तेच कारण इतर घटकांच्या अस्तित्वाला बाधक ठरू शकेल का, याचा विचार व्हायला हवा. तो घटक नष्ट झाल्याने इतरांच्या अस्तित्वावर काय परिणाम घडून येतोय हेही समजून घ्यायला हवं. सजीव सृष्टीचा साकल्याने विचार करताना त्यातला एक घटक अलग काढून तेवढ्यापुरताच विचार करता येणार नाही. एकूणच सजीवांच्या अस्तित्वाला पूरक, हितकारक परिस्थिती निर्माण करणं आणि तशी ती टिकवणं, पर्यावरण अनुकूल राखणं महत्त्वाचं आहे. पक्षि अभ्यासकानं दुर्मिळ होत चाललेल्या पक्षिजाती टिकवण्यासाठी बंदीवासात त्यांची निपज करण्याला त्यांचा विरोध होता तो याच दृष्टिकोनातून. अनुकूल पर्यावरण उपलब्ध असेल, निसर्गाच्या सुस्थापनाची काळजी घेतली तर त्यातले घटक आपापली काळजी घेतील असं त्यांचं सांगणं होतं.

पक्ष्यांविषयी कोणताही उपक्रम आखताना त्यांचं पक्ष्यांविषयीचं प्रेम त्यात अंतर्भूत होतं, तसंच भारत हा शेतीप्रधान देश आहे याचं भानही त्यांच्या पहाऱ्यावर कायम होतं. म्हणूनच कोणताही उपक्रम आखताना ते कमालीचे सावध असत. गेल्या तीस वर्षांत त्यांच्या हाताखाली अनेक विद्यार्थ्यांनी विविध अभ्यास-प्रकल्प पार पाडले. त्या प्रकल्पांचे विषय पाहिले तरी त्यांनी निरीक्षणाला एवढं महत्त्व का दिलं याचा अंदाज येतो. बेडकांच्या निर्यातीमुळे शेतजमिनीत उद्‌भवलेल्या समस्या, निलगिरी आणि बांबू यांच्या नवशेतीमुळे परिसरावर, पक्षि-जीवनावर होणारे परिणाम; केवलादेवघनातील प्राणी, वनस्पती, कीटक, पाणी, पक्षी यांचा परस्पर संबंध, विमानतळावर पक्ष्यांमुळे होणारे अपघात इ.

सालिम अलींच्या प्रेरणेमुळे, आग्रहामुळे आंध्र, बंगलोर, पंतनगर, लुधियाना, दिल्ली आदी कृषिविद्यापीठांनी पक्षि-जीवन आणि भारतीय जंगले-शेती यांच्यातील संबंध शोधण्यासाठी अनेक अभ्यास-प्रकल्प सुरू केले.

पक्षिजीवनाचा विविध अंगांनी परिपूर्ण अभ्यास होण्यासाठी भारतात एक स्वतंत्र पक्षिविज्ञान संस्था असावी यासाठी ते प्रयत्नशील होते. सोसायटीच्या शताब्दी समारोहाच्या मुहूर्तावर मुंबईतील गोरेगाव जवळची चौतीस एकर जागा सरकारने त्यासाठी त्यांना दिलीही. परंतु हे स्वप्न त्यांच्या हयातीत साकार व्हायचं नव्हतं.







# ग्रंथपिसारा

सालिम अलींनी आपल्या पक्षियात्रेत बंदूक-दुर्बिणीइतकंच लेखणीलाही महत्त्व दिलं.

१९२४-२५ सालापासूनच ते आपली पक्षि-निरीक्षणं सोसायटीच्या जर्नलमधून प्रसिद्ध करू लागले होते. १ मार्च १९२७ रोजी जर्नलमध्ये त्यांचा 'द मेटिंग ऑफ पॅराकिटस्' हा लेख प्रसिद्ध झाला. सुरुवातीपासूनच ते किती बारकाव्याने नोंदी घेत होते याचा प्रत्यय हा लेख वाचताना येतो. खुमासदार नि वेधक भाषा, नर्मविनोदाचा शिडकावा यामुळे शास्त्रीय माहिती देणारा लेखही किती वाचनीय होतो याचा अनुभव हा लेख देतो. ते युगुल वागते कसे, बसते कसे, भेटते कसे, किती वेळा भेटते, त्यांचा प्रणय बहरतो कसा याविषयी अत्यंत सहज नि लालित्यपूर्ण भाषेत त्यांनी तपशीलवार लिहिलंय. तो लेख वाचताना आजही त्या भाषेचा टवटवीत जिवंतपणा अनुभवाला येतो.



त्याच सुमारास त्यांनी जर्नलमधून तीन भागांत 'द मुघल एम्पोरर्स ऑफ इंडिया ॲज नॅचरॅलिस्टस् ॲण्ड स्पोर्टर्समेन' ही लेखमाला लिहिली. कला आणि इतिहास या क्षेत्रातला या पक्षितज्ज्ञांचा सहजसंचार स्तिमित करणारा आहे. एखाद्या विषयाचा ते किती खोलवर, किती विविध अंगांनी मागोवा घेत याची आद्य खूण म्हणजे हा लेख.

सुरुवातीचे हैदराबाद नि त्रावणकोर-कोचीन पक्षि सर्वेक्षण अहवाल त्यांच्या दर्जेदार इंग्रजीचा हवाला तर देतातच; पण कोरडी रूक्ष शास्त्रीय माहिती देताना त्यांची लेखणी कंटाळवाणी वळणं टाळते, ढिसाळपणाचा दोष टाळून नेमक्या मोजक्या शब्दांत अहवाल रंजक करते याची अनुभूती येते.

बाया सुगरणीच्या विणीच्या हंगामातील वर्तनाविषयीचा निरीक्षणपर लेख १९३० साली जर्नलमध्ये प्रकाशित झाला. हाच लेख १९३४-३५ साली 'ग्रेट इंडियन मास्टर्स ऑफ इंग्लिश' या संकलनात रवींद्रनाथ टागोर आणि सरोजिनी नायडू यांच्या साहित्याच्या पंक्तीत जाऊन बसला.

पक्षितज्ज्ञ सालिम अलींच्या लेखनशक्तीचा अंदाज क्युरेटर प्रेटरना यायला वेळ लागला नाही.

सर्वसामान्य लोकांना समजेल अशा भाषेत नेहमीच्या आढळातील भारतीय पक्ष्यांवर एक सचित्र पुस्तक तयार करण्याचा प्रस्ताव क्युरेटर प्रेटरनी सालिम अलींसमोर मांडला. सोसायटीकडे असलेल्या चित्रांचा वापर करून पक्षिविषयक अधिक माहिती म्हणून त्यांचे वसतिस्थान, भौगोलिक वितरण, खाद्य सवयी, अन्न, शीळं, त्यांचे उड्डाण, स्थलांतरण, नेहमीचे आढळस्थान याविषयी टिपणे द्यावीत असे त्या पुस्तकाचे स्वरूप ठरले. १९३० साली चर्चिलेली ही कल्पना साकार व्हायला १९४१ साल उजाडलं. 'द बुक ऑफ इंडियन बर्ड्स' हेच ते पुस्तक.

सदर पुस्तक फारच गाजलं. अत्यंत साधी भाषा हे त्या पुस्तकाचं खास वैशिष्ट्य. पक्षिजीवनातील तपशील नि त्यांची वर्णनं अत्यंत बारकाव्याने नोंदलेली. पक्षि जगताविषयी उत्सुकता वाढवणारं हे पुस्तक अल्पावधीतच लोकप्रिय झालं.

हे पुस्तक तयार करण्याच्या कामी त्यांना तेहमिनानेही खूप मदत केली. तिचं इंग्रजी सफाईदार. या पुस्तकाची मुद्रण प्रत तयार करताना, त्यात नेटकेपणा आणताना त्यांना तिची खूपच मदत झाली.

'द बुक...' सालिम अलींना वरदान ठरलं. ब्रह्मदेशातून परतताना सालिम अलींच्या डोक्यावर कर्जाचा डोंगर होता. ते कर्ज त्यांना बेचैन करी. झोप उडवी. या पुस्तकाच्या लागोपाठच्या चार-पाच आवृत्त्यांपायी मिळालेल्या मानधनातून त्यांनी कर्ज फेडलं.





आजवर या पुस्तकाच्या अकरा आवृत्त्या निघाल्यात. साठ एक हजार प्रती विकल्या गेल्यात. प्रत्येक वेळी नवी आवृत्ती अद्ययावत करून मगच त्यांनी ती प्रसिद्ध केली. आपलं शास्त्रीय लेखन हे जास्तीत जास्त परिपूर्ण असेल याची ते नेहमीच दक्षता घेत.

'द बुक ऑफ इंडियन बर्ड्स' संबंधी अनेक हृद्य, रम्य आठवणी आहेत. झफर फतेहअली (सालिम अलींचे भाचेजावई) यांनी आठवण दिलीय– झफरसाहेबांचा एक मित्र दुसऱ्या जागतिक महायुद्धाच्या काळात इंडोनेशियात कैद्यांच्या छावणीत होता. तिथे त्याला हे पुस्तक वाचायला मिळालं. तुरुंगवासातच तो कैदी पक्षिमित्र बनला. पुढे तीस वर्षांनी तो भारतात आला तेव्हा त्याने त्या प्रतीवर आठवणीने सालिमसाहेबांची स्वाक्षरी घेतली.

हे पुस्तक प्रकाशित झालं त्या वेळी पं. नेहरू डेहराडून कारावासात होते. सालिम अली त्या सुमारास काही काळ डेहराडूनमध्ये वास्तव्यास होते. योगायोगाने सालिम अलींचा घरमालकच पं. नेहरूंचा जेलर होता. तो सालिम अली – नेहरूंच्या पत्रांची, निरोपांची ने-आण करी. सालिम अलींची स्वाक्षरी 'द बुक...' च्या एका प्रतीवर घेऊन ती पंडितजींनी इंदिरा गांधींना वाढदिवसाची भेट म्हणून पाठवली. त्या वेळी त्या नैनीच्या जेलमध्ये कैद भोगत होत्या. सोसायटीच्या शताब्दी समारोहात (१५ सप्टें. १९८३)- भाषण करताना इंदिराजींनी आठवण सांगितली – 'प्राण्यांविषयी मला प्रेम होतंच, परंतु नैनी कारागृहाच्या उंच भिंतींनी पक्ष्यांचं दर्शन मला दुर्लभ करीपर्यंत मी त्यांच्या बाबतीत अज्ञानीच होते... भिंतीपलीकडून येणाऱ्या शिळेकडे माझं प्रथमच लक्ष वेधलं गेलं. मी ती शीळ पक्की लक्षात ठेवली आणि सुटकेनंतर ह्या पुस्तकाच्या आधारे त्या पक्ष्याचा शोध घेतला...'

'रीड फास्टर, रीड बेटर' या पुस्तकाच्या शेवटी लेखकाने काही पुस्तकांची यादी दिलीय. त्यात ललितेतर पुस्तकांच्या यादीत 'द बुक...' चाही समावेश आहे.

मौ. आझादांनी या पुस्तकाचा वापर चिमणाचिमणीवरची एक कथा लिहिताना केलाय. ते तुरुंगवास भोगत असताना त्यांच्या कोठडीत नियमितपणे येणाऱ्या एका चिमण जोडप्यावर त्यांनी कथा लिहिली. ती कथा लिहीत असताना त्यांनी सहप्रवासी पं. नेहरू यांच्याकडून 'द बुक...' संदर्भासाठी मागून घेतलं होतं.

'द बुक...' नंतर त्यांनी पक्षि-सर्वेक्षणावर आधारित अनेक पुस्तके लिहिली – बर्ड्स



ऑफ कच्छ, इंडियन हिल बर्ड्स, द बर्ड्स ऑफ त्रावणकोर-कोचीन, द बर्ड्स ऑफ सिक्कीम वगैरे. मुंबई परिसरातील पक्ष्यांवरही त्यांनी 'द बर्ड्स ऑफ बॉम्बे ॲण्ड सालसेट' हे पुस्तक लिहिलं. त्यांच्या बहुतेक सर्व पुस्तकांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. जागतिक कीर्तीच्या पक्षितज्ज्ञांनी त्यांच्या पुस्तकांच्या गुणवत्तेची चाहा केली.

'पिक्टोरियल गाईड टू द बर्ड्स ऑफ इंडिया ॲण्ड सब-कॉंटिनेंट' या ग्रंथावर त्यांनी अपार परिश्रम घेतले. आणि त्यामागे एक विशेष कारणही होतं. पक्ष्यांचा मागोवा घेण्यासाठी मार्गदर्शक ठरू शकेल असं एकही सचित्र पुस्तक बालपणी त्यांना उपलब्ध नव्हतं. त्या अभावी निसर्गात वावरणारा पक्षी अचूक ओळखणं कठीण जायचं. अशा वेळी पक्षी मारून जाणकाराकडून त्याची माहिती घ्यावी लागे. ती उणीव या ग्रंथाने दूर केली.

भारतीय पक्षिशास्त्रात सर्वांत मोलाची भर घातली ती त्यांच्या 'हॅण्डबुक ऑफ बर्ड्स ऑफ इंडिया ॲण्ड पाकिस्तान' या दशखंडात्मक ग्रंथराजाने. डॉ. सिडने दिलन रिप्ली हे त्यांचे सहलेखक.

१९२९ ते १९३० या काळात 'द फौना ऑफ ब्रिटिश इंडिया' ची अष्टखंडात्मक आवृत्ती स्टुअर्टबेकरनी काढली. नंतरच्या वीस वर्षांत अनेक ब्रिटिश व भारतीय पक्षि तज्ज्ञांनी भारतीय पक्षिविज्ञानात भर टाकली. टाईसहर्स्ट, ह्यू व्हिस्लर, डॉ. रिप्ली यांच्या नि स्वत:च्या नोंदी-निरीक्षणांचा आधार घेऊन 'द फौना...' ची नवी आवृत्ती काढणं जरुरीचं आहे असं सालिम अलींच्या मनानं घेतलं. त्या दृष्टीनं त्यांनी १९४६ साली मिश्मी पक्षि-सर्वेक्षण मोहिमेच्या काळात रिप्लीसाहेबांशी या ग्रंथमालेच्या स्वरूपाविषयी चर्चा केली होती. नव्या आवृत्तीत पक्ष्यांविषयी, त्यांच्या शारीरिक वैशिष्ट्यांविषयी माहिती देताना परिस्थिती, पर्यावरण यांचीही जोड द्यायची असं ठरलं. यामुळे मूळच्या ग्रंथमालेत सचित्र व वर्णनात्मक भाग वाढणार होता. वर्गीकरणाचा विभाग रिप्ली सांभाळणार होते तर पर्यावरण, परिसंस्थेचा वर्णनात्मक भाग सालिम अली पाहणार होते. ही नवी आवृत्ती आता 'हॅण्डबुक ऑफ बर्ड्स ऑफ इंडिया ॲण्ड पाकिस्तान' या नव्या नावाने प्रकाशित करायचे ठरले.

या ग्रंथमालेच्या पूर्वतयारीसाठीच चार वर्षं लागली. मोठ्या प्रमाणावर ग्रंथालयीन संशोधन, शास्त्रीय टिपणं यांचं संकलन करावं लागलं. भारत सरकार, इंडियन नॅशनल सायन्स ॲकॅडेमी आणि काही अमेरिकन शैक्षणिक संस्था यांनी आर्थिक सहकार्य दिलं.

प्रत्यक्ष हस्तलिखिताची सुरुवात १९६४ मध्ये झाली. पहिला खण्ड प्रकाशित व्हायला १९६८ साल उजाडलं. शेवटचा १९७४ मध्ये इंदिराजींच्या हस्ते प्रकाशित झाला. सालिम अलींनी वयाच्या ६८ व्या वर्षी सुरू केलेला हा ग्रंथमाला प्रकल्प वयाच्या ७८ व्या वर्षी पूर्ण झाला.





टंकलिखित मजकुराची चाळीस खोकी झाली.

या सर्व खंडांत भारतीय उपखंडात आढळणाऱ्या १२०० पक्षिजाती त्यांच्या २१०० उपजातींसह नोंदल्या आहेत. त्यांची सर्वांगीण माहिती, ११३ उत्कृष्ट रंगीत चित्रे, रेखांकने, नकाशे, आकृत्या यांनी ते खण्ड परिपूर्ण झालेत. विशेष म्हणजे भारतीय पक्ष्यांची स्थानिक नावेही त्यात नोंदवलीत.

ह्या ग्रंथमालेचं काम फार जिकिरीचं होतं. पुढचा खंड बाहेर पडण्यापूर्वीच आदल्यांची आवृत्ती संपलेली असे. त्यांची नवी आवृत्ती काढताना अद्ययावतता राखण्यासाठी या लेखकद्वयीची धावपळ उडे. काही बदलही असत. पुनर्लेखन करताना ते ठरावीक जागेत बसवायचं आहे याचे भान राखावं लागे. कारण शेवटच्या खंडात सूची असणार होती. ही सारी अवधानं सांभाळणं म्हणजे तारेवरची कसरतच.

या कसरतीतला तिसरा भागीदार जमशेद पी. इराणी. हॅंडबुकमध्ये वापरण्यास योग्य अशी पक्ष्यांची काटेकोर रंगीत चित्रं काढू शकणाऱ्या भारतीय कलाकाराच्या शोधात सालिम अली होते. त्यांच्या कानी जमशेद इराणींचं नाव आलं. त्यांनी त्यांना लागलीच बोलावून घेतलं.

जमशेद पी. इराणी हे चित्रकार खरे, परंतु त्यांना शास्त्रशुद्ध पक्षिचित्राचं तंत्र माहीत नव्हतं. ते आधी त्यांना सालिम अलींकडून समजून घ्यावं लागलं. पक्ष्यांच्या पिसांचा अभ्यास करून, पेंढा भरलेल्या पक्ष्याला त्याच्या नैसर्गिक पद्धतीने बसवून, प्रमाणबद्ध आरेखन करून, प्रत्यक्ष पिसांचे रंग तंतोतंतपणे चित्रात उतरवावे लागतात आणि पक्ष्याची पार्श्वभूमी रंगवतानाही ऋतूचं भान ठेवावं लागतं. पिसांचा रंग विणीच्या हंगामाचा असेल तर पार्श्वभूमी उन्हाळ्याची दर्शवून चालणार नाही.

हे सारं तंत्र आत्मसात करण्यासाठी इराणींनी सालिम अलींकडे अनेक खेपा घातल्या. धडे गिरवले. सकाळी सहालाच ते सालिम अलींच्या बंगल्यावर हजर व्हायचे. दुपारचं जेवणही तिथेच... दहा दहा तास काम करत. वेगवेगळ्या पुस्तकांतील संदर्भ त्यांच्यासमोर ठेवून सालिम अली त्यांच्या चित्रात जास्तीत जास्त अचूकता आणण्यासाठी धडपडत. त्यांनी इराणींच्या बरोबरीने कुंचला हातात घेतला नव्हता एवढंच काय ते. इराणींच्या चित्रांच्या परिपूर्तीत जराही कसूर येऊ नये म्हणून ते डोळ्यात तेल घालून दक्ष होते.

इराणींच्या कार्यपद्धतीवर, आविष्कारावर ते बेहद्द खूष झाले. 'हॅण्डबुक'मधली चित्रं त्यांच्या मनाजोगती उतरल्यानं ते इराणींवर विश्वासले. पुढे त्यांनी इराणींना सोसायटीच्या जर्नलच्या मुखपृष्ठाचं काम दिलं. भूतान सरकारच्या पोस्टल स्टॅम्प्स्चंही काम दिलं. मात्र हे काम देताना स्वभावास अनुसरून एक समजही दिली... 'स्टॅम्प्स्चा आकार छोटाच असू दे बरं का! ते परदेशी स्टॅम्प्स् आकाराने फार मोठे असतात. त्यांना जिभेवर ठेवून ओले करता करता जीभच कोरडी पडते. तसं व्हायला नको!'



या दशखंडात्मक ग्रंथमालेचं काम त्यांनी हाती घेतलं तेव्हा त्यांचं वय होतं अडुसष्ट. ते काम दहा वर्षांनी संपलं. या वृद्ध ज्ञान-महर्षीनं या ज्ञान यज्ञामागची भूमिका विशद करताना पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेत म्हटलंय – '...यापूर्वी भारतीय पक्षिविज्ञान केवळ पक्ष्यांची अंडी आणि पक्षि नमुने गोळा करणं एवढ्यावरच थांबत होतं... नंतर पक्षिनिरीक्षणालाही मान्यता मिळाली पण हे सारं ब्रिटिश सरकारी अधिकाऱ्यांपुरतंच मर्यादित होतं... या अधिकाऱ्यांचा कालावधी वेगवेगळा, स्थळं भिन्न. त्यांतल्या कितीतरी जणांना पक्ष्यांचं शरीरविज्ञानही माहीत नव्हतं... तसंच त्यांच्या पक्षिविषयक नि त्यांच्या भौगोलिक वितरणविषयक नोंदींबद्दल विश्वासार्हता आणि अधिकृतता मानता येत नव्हती...' ही उणीव दूर करून भारतीय पक्षिविज्ञानाला अधिकृततेची बैठक आणि संदर्भग्रंथाची जोड देण्याची कामगिरी सालिम अली आणि रिप्ली यांनी या ग्रंथमालेद्वारे पार पाडली.

या ग्रंथमालेचीही आंतराष्ट्रीय वाखाणणी झाली. भारतीय पक्षिविज्ञानाची ही भरारी स्पृहणीय ठरली.

पक्षिनिरीक्षकाला हे दहाही खंड पक्षिनिरीक्षणासाठी बरोबर वागवणे अशक्यप्रायच होतं. म्हणून लेखकद्वयीनं अवघ्या ग्रंथमालेची एक कॉम्पॅक्ट आवृत्ती काढली. मूळ ग्रंथाची चार चार पानं छोट्या आकारात एकाच पानावर छापल्याने संपूर्ण ग्रंथमाला एकाच खंडात सामावली. किंमतही मूळच्या एक-तृतीयांश झाली.

सालिम अलींच्या पक्षिविषयक ग्रंथांइतकंच त्यांचं आत्मचरित्र 'द फॉल ऑफ अ स्पॅरो' हेही गाजलं.

१९८१ साली पचमढी राष्ट्रीय उद्यानाचं उद्घाटन त्यांच्या हस्ते झालं. आणि पुढच्या वर्षी तिथल्याच विश्रामगृहात मुक्काम ठोकून त्यांनी आत्मचरित्राच्या मजकुराची जुळवाजुळव सुरू केली. प्रत्यक्ष लेखनास सुरुवात करण्याआधी तीनचार वर्षं ते आपल्या पूर्वस्मृती जाग्या करत होते. कालानुक्रमाचं बंधन न घेता नोंदी कागदावर उतरवत होते. या कामी त्यांना मोलाची मदत झाली ती श्री. जे.एस. सेराव यांची. गेली चार दशकं श्री. सेराव त्यांच्या हाताखाली काम करत आले होते. त्यांच्या सहवासात होते. श्री. सेराव यांच्या तीव्र स्मरणशक्तीचा उपयोग सालिम अलींना झाला.

मजकुरात एकसूत्रता यावी, त्याची लय कायम राहावी म्हणून त्यांना हे पुस्तक खरं तर अल्पावधीत लिहून पूर्ण करायचं होतं. पण त्यांच्यापाठी कार्याचा व्यापच एवढा मोठा की हवा तसा निवांतपणा मिळालाच नाही.

ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसच्या कार्यक्षमतेबद्दल, संपादन कौशल्याबद्दल सालिम





अलींना नितान्त आदर. त्यांची आजवरची बहुतेक सर्व पुस्तकं या प्रकाशन संस्थेनेच प्रकाशित केलेली. प्रत्येक वेळी श्री. हॉकिन्स यांच्या संपादन कौशल्याचा लाभ सालिम अलींना घडत आला होता. किंबहुना या संस्थेमार्फत प्रकाशित होणाऱ्या आपल्या पुस्तकाचं संपादन हॉकिन्ससाहेबांनीच करावं यावर त्यांचा कटाक्ष असे.

स्वत: हॉकिन्स पक्षिमित्र. सालिम अलींच्या मित्र परिवारातले. त्यांच्या समवेत अनेक पक्षि-मोहिमांत, पक्षिनिरीक्षण कॅम्प्स्‌मध्ये सहभागी झालेले. त्यांनीच सालिम अलींना आत्मचरित्र लिहायला प्रवृत्त केलं. ते लिहून पूर्ण झाल्यावर त्याचं संपादनही केलं. सालिम अलींनी ते आपल्या या मित्रालाच अर्पण केलंय.

आत्मचरित्र लिहून पूर्ण झाल्यावर कितीतरी दिवस सालिम अलींना त्यासाठी समर्पक नाव सुचत नव्हतं. 'मेमॉयर्स ऑफ अ व्हॅग्रेट ऑफ जंगल', 'इन फुल फ्लाईट', 'सम ड्रिम्स कम ट्रू' वगैरे नावं काही मित्रांनी सुचवली. पण स्वत:लाच सुचलेलं नाव समर्पक वाटल्याने त्यांनी ते आत्मचरित्राला दिलं – 'द फॉल ऑफ अ स्पॅरो'.

१२ नोव्हें. १९८५ रोजी त्यांच्या एकोणनव्वदाव्या वाढदिवशी हे आत्मचरित्र प्रकाशित झालं.

'द फॉल ऑफ अ स्पॅरो' एक अभिजात इंग्रजी वाङ्मयाचा नमुनाच. विलक्षण समृद्ध नि अस्सल ब्रिटिश वळणाची भाषा. मोजक्या पण नेमक्या शब्दांतली मांडणी, मधूनमधून विनोदाचा सुखद शिडकावा, प्रत्ययकारी निवेदन शैली यांमुळे आत्मचरित्राला एक वेगळाच बाज आलाय. रोचकता वाढलीय. आपल्या मित्र-परिवारातील काही निकटवर्तीयांची व्यक्तिचित्रंही त्यांनी त्यात रेखाटलीत. ज्याचं त्याला श्रेय दिलंय. गुणदोषही सांगितलेत. आत्मस्तुती वा आत्मश्लाघा दूर ठेवून निवेदन केलंय. कोणाबद्दल आणि कशाबद्दलही कटू भावना व्यक्त न करता त्यांनी आपली जीवनकहाणी सांगितलीय. स्वत:बद्दल अतिशय अलिप्तपणे लिहिलंय. आपल्याबद्दल इतरांचं काय वाईट मत होतं तेही सांगून मोकळे झालेत.

दिवसेंदिवस, महिनोन् महिने, वर्षांमागून वर्षं दऱ्याखोऱ्यांतून फिरणाऱ्या, पक्ष्यांमागे हिंडणाऱ्या आणि उर्वरित वेळ त्यांच्या नोंदी अक्षरबद्ध करण्यात व्यतीत करणाऱ्या या पक्षिशास्त्रज्ञाला 'खाजगी' आयुष्य असं काही नव्हतंच. पक्षि-अभ्यास हा त्यांच्या आयुष्याचा गाभा. मूलाधार. तोच त्यांच्या आत्मचरित्राचा आलेख.

रंजकता नि वाचनीयता ही त्यांच्या लिखाणाची प्रमुख वैशिष्ट्यं–मग विषय शास्त्रीय असो की आत्मचरित्र असो. आपलं लिखाण दर्जेदार असावं यासाठी त्यांचे जाणीवपूर्वक प्रयत्न असत. या बाबतीत ते आपले पूर्वसूरी एडवर्ड हॅमिल्टन ॲटकिन (EHA) उर्फ इहा यांचा ऋणनिर्देश करत.

'...इहाची लेखणी ओघवती दिसते खरी पण तो सारं लेखन पुन्हा पुन्हा लिहून



काढून त्यात सफाई आणी... मीही तसंच करतो. लिहिलेलं वाचून, तपासून, दुरुस्त करून पुनर्लेखन करतो... यात फार वेळ जातो... पक्ष्यांवरती पुस्तकं लिहिणं आधीच कष्टप्रद, त्यात पुन्हा ती पुस्तकं अद्ययावत ठेवायला हवीत... एवढं सारं करायला वेळ फार कमी पडतो... नुसती कोरडी माहिती कोण वाचणार? ती रंजकही हवीच...'

लिखाण सुरू करण्यापूर्वी ते प्रथम संबंधित विषयाचे मुद्दे काढत. मग त्यांच्या आधारे पहिला मसुदा तयार व्हायचा. तो मसुदा आठवडा-दोन आठवडे एखाद्या फळीवर आराम करे. तोवर ते आपला विचार पक्का करत. मग नवा सुधारित मसुदा. हा मसुदाही दोन ओळींत तीन-तीन ओळींचं अंतर सोडून टंकलिखित करत. याचीही फेरतपासणी व्हायची. बाणाखुणांनी तो रंगायचा. प्रत्येक मुद्द्याचं नि मजकुराचं स्थान निश्चित व्हायचं. पुन्हा नव्याने टंकलेखन... ही निर्दोष प्रत छापखान्यात रवाना होण्यापूर्वीही सालिम अली त्यावर एक नजर टाकायला विसरत नसत.

पहाटे पाचपासूनच त्यांच्या खोलीतून टाईपरायटरची टिक् टिक् ऐकू यायची. दशखंडात्मक हॅण्डबुक ग्रंथमालेचा अपवाद वगळता त्यांच्या इतर सर्व ग्रंथांचं टंकलेखन त्यांनी स्वहस्ते केले. पुस्तकांच्या चळतीवर किंवा टेबलावर योग्य त्या उंचीवर आपला जुना हर्मिस बेबी टाईपरायटर ठेवून त्यांचं टंकलेखन सुरू असे.

लिखाणाच्या बरोबरीनं त्यांचं मुद्रितं तपासण्याचंही काम चालू असे. अगदी विरामचिन्हांच्या जागाही त्यांच्या नजरेतून सुटत नसत. अत्यंत बारकाईनं काम चाले.

एखाद्या पुस्तकाची नवी आवृत्ती काढतानाही त्याची अद्ययावतता राखण्याचं काम कसोशीने चाले.

स्वत:ची एकशे एक टक्के खात्री झाल्याशिवाय हाती आलेली नवी माहिती प्रसिद्ध करायची नाही; मनासारखं कागदावर उतरल्याखेरीज ते छापखान्यात पाठवायचं नाही ही शिस्त. आपण जे काही लिहू, प्रकाशित करू ते पुढच्या पिढीचं धन आहे; शास्त्रीय पुराव्याचं, संदर्भ ग्रंथांचं मोल त्याला आहे म्हणून ते निर्दोष नि अधिकृत हवं यासाठी ते कमालीची दक्षता घेत.

आणि फक्त शास्त्रीय दृष्ट्या महत्त्वाची म्हणून पुस्तकं प्रकाशित करण्याचं कर्तव्य त्यांना उरकायचं नसे. आपलं प्रत्येक पुस्तक देखणं, सुबक हवं. त्याची छपाई उत्कृष्ट हवी, मुखपृष्ठ आकर्षक हवं असा त्यांचा आग्रह असे. आणि असं तयार होऊन पुस्तक त्यांच्या हाती आलं की त्यावरून प्रेमाचा हात फिरवताना त्यांना विलक्षण समाधान मिळे. 'कामचलाऊ', 'चालून जाईल' अशा सदराखाली मोडणारी कामं त्यांची मान्यता मिळवू शकत नसत.

आपली पुस्तकं परिपूर्ण हवीत, तशीच अद्ययावतही असावीत यासाठी ते नेहमीच प्रयत्नशील असत. अगदी नव्वदीतही त्यांचा हा बाणा सुटला नाही. 'द बुक ऑफ





इंडियन बर्ड्स'ची अकरावी आवृत्ती काढतानाही, आणखी कोणते पक्षी त्यात समाविष्ट करता येण्याजोगे आहेत याविषयीची पृच्छा त्यांना भेटायला येणाऱ्या तरुण पक्षिमित्रांकडे केल्याशिवाय राहिले नाहीत. असा हा परिपूर्ततेचा ध्यास.

जाणीवपूर्वक अचूकता हा त्यांचा स्वभावधर्म. लेखनातही ती उतरली पाहिजे म्हणून ते तासन् तास एकाग्रतेने लेखन करत. अशा वेळी कोणी अनाहूतपणे भेटीसाठी आलं किंवा पाल्हाळानं बोलून वेळ खाऊ लागलं की त्यांची नाराजी त्यांना लपवता येत नसे. वाया घालवण्याजोगं रिकामपण त्यांच्यापाशी नव्हतंच.

जेव्हा पक्षिमोहिमेवर नसत किंवा ग्रंथलेखनाच्या व्यापात नसत त्या वेळी त्यांचं नोंदी उतरवण्याचं काम चालू असे. त्यांच्या खिशात एक छोटी डायरी नि एक पेन्सिल कायमचीच. त्या डायरीचं कुठलंही पान उघडून पाहिलं तरी त्यांचं ठराविक वळणाचं अक्षर नजर वेधून घेई. जणू पक्षी तारेवर एका रांगेत बसलेत. वळणदार, एकसारखं अक्षर. कुठे खाडाखोड नाही. गिचमीड नाही. बहुतेक सर्व नोंदी पेन्सिलीनेच लिहिलेल्या. जंगलात, पर्वतावर नाही तर रणात असताना शाई संपली तर आणा कोठून! म्हणून पेन्सिलीचा आग्रह. नंतरनंतरच्या काळात तिची जागा बॉलपेननं घेतली.

या पक्षिनिरीक्षकानं, पक्षितज्ज्ञानं आपल्या आयुष्यात बंदूक, दुर्बीण यांच्याइतकंच लेखणीलाही महत्त्व दिलं. आयुष्यभराचा अभ्यास करून भावी पिढीला वारसा ठेवला.







# पक्षिगण

एखाद्या व्यक्तीला एखादा विशिष्ट विषय अतिप्रिय असेल, ती त्यात गुंतलेली असेल तर ती व्यक्तीही त्या विषयासारखीच भासू लागते, असं म्हणतात. ...'याचा पडताळा मला सालिम अलींबाबतही येतो... भरतपूरमध्ये असताना आम्ही दोघं केवलादेवघनात भ्रमंतीसाठी जात असू. पक्ष्यांना कडी चढवण्याच्या कामी मीही मदत करत असे... सालिम अली आता दिवसेंदिवस अधिकाधिक प्रमाणात पक्ष्यासारखे दिसू लागलेत हे जाणवलं... त्यांचे हावभाव, हालचाली, बोलताना मधूनच पक्ष्याच्या पट्टीत जाणारा आवाज... सारी लक्षणं पक्ष्याची!' श्री. के.पी.एस. मेनन यांनी आपल्या 'Delhi to Chunghic' या प्रवासवर्णनात १९ सप्टें. १९४४ रोजीची ही नोंद नोंदवलीय.





सालिम अलींची देहयष्टी पक्ष्याला साजेशीच होती. बारीक नि चिवट. पायही पक्ष्यासारखेच लांब नि काटकोळे. नाक चोचीसारखं बाकदारपणे पुढे आलेलं. आवाज वरच्या पट्टीतला. तीव्र. पक्ष्यासारखेच ते कायम फिरत असायचे. पायात कडं चढवलेलं नव्हतं एवढंच काय ते.

या पक्ष्यानेही कधीकाळी एक छोटंसं घरटं उभारलं होतं – डेहराडूनमध्ये. तेहमिना अन् सालिम यांचं घरकुल.

सुरुवातीच्या दोन सर्वेक्षण मोहिमांना – हैदराबाद नि त्रावणकोर-कोचीन – तेहमिनानं आर्थिक साहाय्य दिलं. आपल्या श्रीमंत माहेराकडून जे काही मिळालं त्यातून तिनं पतीच्या कार्याला आर्थिक बळ दिलं. कोणत्याही परिस्थितीत त्याला आपल्या ध्येयापासून, उद्दिष्टापासून, छंदापासून वंचित व्हावं लागू नये म्हणून ती दक्ष होती. मदतनीस, सचिव, सखी, सहचरी, सहकारी... सर्व भूमिकांतून पतीच्या कार्यात सहभागी झाली.

पत्नी आपल्या कार्याला सर्वतोपरी मदत देतेय ही अनुभूती आनंददायक असली तरी तिने तिच्या हक्काचा पैसा आपल्या कामी खर्चत राहावं हे त्यांना रुचेना. इत:पर तिच्यावर आर्थिक भार टाकायचा नाही. तिचे श्रम आपल्या छंदपूर्तीसाठी खर्ची घालायचे नाहीत असा निर्णय त्यांनी घेतला.

आणि या निर्णयपूर्तीसाठी त्यांना आणखीही एक महत्त्वाचा निर्णय घ्यावा लागला– मुंबई सोडण्याचा.

जर्मनीहून प्रशिक्षण घेऊन परतल्यावर चार वर्षं गेली तरी त्यांना आर्थिक स्थैर्य लाभलं नव्हतं. पहिल्या दोन्ही पक्षि-सर्वेक्षणांची तज्ज्ञांनी चाहा केली. पण त्यापासून आर्थिक लाभ घडलेला नव्हता. सर्वेक्षणव्यतिरिक्तच्या काळात या ना त्या नातेवाइकाच्या आसऱ्याने राहावं लागे. ही परिस्थिती नक्कीच श्रेयस्कर नव्हती. फार काळ मानवणारी नव्हती.

तेहमिना आणि सालिम दोघंही स्वाभिमानी. म्हणूनच, आर्थिकदृष्ट्या परवडेल आणि मुंबईसारख्याच सुशिक्षित-सुसंस्कृत समाजात वावरता येईल, बौद्धिक उपासमार होणार नाही असं गाव निवडून स्थायिक होण्याचा निर्णय त्यांनी घेतला. गाव निवडलं डेहराडून.

फार वर्षांपासून सालिम अली एक स्वप्न उराशी बाळगून होते. जेव्हा कधी संधी मिळेल तेव्हा हिमालयाच्या कुशीत, निसर्गाच्या सान्निध्यात एक घरटं बांधायचं. सुंदर वनश्री, भोवती पक्षी, मनमुराद भ्रमंती अन् साथीला प्रगल्भ, तरल, प्रसन्न, खेळकर तेहमिना. मग आणखी काय हवं!

डेहराडूनच निवडण्यामागे आणखीही एक कारण होतं – तिथल्या 'फॉरेस्ट रिसर्च इन्स्टिट्यूट'चं ग्रंथालय.



१९३५ साली तेहमिना नि सालिम अली मुंबई सोडून डेहराडूनला आले. इथल्या वास्तव्यात सालिम अलींनी हिमालयात अनेक पक्षि-सर्वेक्षण नि निरीक्षणं मोहिमा पार पाडल्या. डोंगरी लाव्याचा कसून शोध घेतला. त्यासाठी डोंगरटेकड्या पालथ्या घातल्या. अनेकदा तेहमिनाही या भ्रमंतीत सहभागी असे.

चार वर्षं फार सुखाची-समाधानाची गेली. मनासारख्या पक्षि मोहिमा पार पडल्या. चांगला मित्रपरिवार जमला. दिवस कसे सोनपाखराच्या पंखांवरून पार पडत होते... पण अचानक अघटित घडलं. एका साध्याशा शस्त्रक्रियेत ९ जुलै १९३९ रोजी तेहमिनाचा मृत्यू झाला. सालिम अलींचं घरटं उन्मळून पडलं. उद्ध्वस्त झालं. त्यांचं मन आता डेहराडूनमध्ये रमेना. तेहमिनाच्या मृत्यूनंतर एका विलक्षण उदासीने त्यांना घेरलं. अशा विषण्ण मन:स्थितीत त्यांना तिथेच सोडून येणं त्यांच्या बहिणीला, कमरुन्निसाला पटेना.

कमरुन्निसा आणि तिचे पती हसन अली यांच्या आग्रहामुळे सालिम अली मुंबईला परतले.








मुंबईला आले खरे पण तेहमिनाच्या स्मृती सालिम अलींना घेरूनच होत्या. तिचं अवतीभवती असणं हे त्यांनी कायमचं म्हणून गृहीत धरलं होतं. तिचं असं एकाएकी जाणं मान्य करायला त्यांचं मन राजी नव्हतं. उद्विग्नता कशी ती कमी होत नव्हती.

ते मुंबईला परतले त्या सुमारास म्हणजे १९४०-४१ मध्ये मुंबईत विषमज्वराची साथ जोरावर होती. त्या साथीत सालिम अली नि त्यांचा भाचा – कमरुन्निसाचा मुलगा मुराद – दोघंही आजारी पडले. मुराद त्या साथीत गेला. त्या वेळेस तर 'त्याच्याऐवजी मीच का नाही गेलो' म्हणून ते वारंवार बोलून दाखवत. तेहमिनाच्या अभावी त्यांना सारं नीरस, रिक्त वाटत होतं.

मनाचं हे रितेपण घालवावं म्हणून एखादं पक्षि-सर्वेक्षण, तेही परदेशातील, हाती घ्यावं अशा विचाराने त्यांनी अनेक देशीविदेशी संस्थांशी पत्रव्यवहार केला. पण त्यात यश आलं नाही. शेवटी त्यांचे मित्र ह्यू व्हिस्लर यांच्या सल्ल्यानुसार त्यांनी म्हैसूर प्रदेशाचं पक्षि-सर्वेक्षण हाती घेतलं.

आता पक्षी हाच एकमेव छंद. पक्षी हाच एकमेव विरंगुळा. विसावा. सर्वार्थाने, सर्वस्वाने त्यात त्यांनी स्वत:ला झोकून दिलं. तेच त्यांच्या जगण्याचं प्रयोजन ठरलं.

सालिम अली मुंबईला परतले. त्यांच्या वास्तव्याची सोय कमरुन्निसाने स्वत:च्या बंगल्यात केली. पुढे चाळीस वर्षं त्यांचं हेच निवासस्थान होतं. ३३ पाली हिल, बांद्रे. पत्त्याच्या मजकुरात फरक झाला तो ३३ ऐवजी बंगल्याला ४६ क्रमांक मिळाला तेव्हा नि तेवढाच.

बहिणीच्या घरी ते वास्तव्याला आले तेही एका अटीवर. आपल्याला स्वतंत्र खोली हवी. ती अट बहिणीने पुरी केली. आपल्या बंगल्याच्या तळमजल्यावरची खोली त्यांना दिली.

तेहमिनाच्या मृत्यूनंतर सालिम अलींचं संसारातून मन उडालं होतंच. त्यात आता बहिणीकडे राहू लागल्यावर तिनेच त्यांची घरगृहस्थी पाहायला सुरुवात केली. त्यामुळे ते अधिकच मुक्त झाले. संसारी व्यापातून मोकळे झाले. अन् आपल्या कार्यात, अभ्यासात अधिक खोलवर गुंतत गेले.

पुस्तकांनी व्यापलेली त्यांची ती खोली म्हणजे एक छोटं ग्रंथघरच. पुस्तकांनी साऱ्या भिंती झाकलेल्या. जमिनीवरही पुस्तकांचे उंच चौथरे... टेबलावर कागद-फायलींचे भले थोरले ढीग... नवखा माणूस त्या खोलीत शिरला तर सालिम अली पटकन् दिसतही नसत. त्यांना साद घालून ते कुठे आहेत याचा अंदाज घ्यावा लागे. तसं न करताच कोणी त्यांना शोधू लागला तर त्याच्या धक्क्याने एखादं तरी पुस्तक हमखास पडे अन् मग त्या नीरव शांततेचा भंग कोणी केला ते पाहायला सालिम अली एखाद्या चौथऱ्याआडून समोर येत.



टेबलावर एका कोपऱ्यात छायाचित्रांच्या आल्बम्सचाही एक मोठा चौथरा असे. अगदी १९२४-२५ सालापासूनची छायाचित्रं. प्रत्येकाखाली तारीख. बहुतेक सारी पक्ष्यांची, अंड्यांची, घरट्यांची छायाचित्रं... उरलेली छायाचित्रं मित्र-परिवाराची... भाच्या-पुतण्यांची, तेहमिनाची. तिचं त्यातलं एक दुर्मिळ छायाचित्र १९३०-३२ मधलं. पालथी मांडी घालून तेहमिना चरख्यावर एकाग्रतेने सूत काततेय... दुसरं असिफाबादमधला नरमांसभक्षक वाघ मारल्यावर त्याच्यावर पाय ठेवून सालिम अली उभे आहेत... आणखी एक चौथरा– पक्षि-सर्वेक्षण, निरीक्षण मोहिमांतील रोजनिशांचा. प्रत्येक मोहिमेतील कच्च्या नोंदीच्या या रोजनिशा.

कोणत्याही सालातल्या कोणत्याही छायाचित्राची निगेटिव मागा, कोणत्याही पक्षि सर्वेक्षण – निरीक्षण मोहिमेच्या खर्चाचा तपशील मागा... कोणत्याही चौथऱ्यातल्या कोणत्याही पुस्तकातला एखादा संदर्भ विचारा, एवढंच कशाला त्यांनी दिलेल्या कोणत्याही व्याख्यानाची अथवा लिहिलेल्या लेखाची टंकलिखित प्रत मागा... पाच मिनिटांत उपलब्ध. पुन्हा जे पुढे ठेवले जाईल त्याची अवस्था जाणीवपूर्वक, काळजीपूर्वक सुस्थित राखलेली. धुळीच्या एका कणालाही सवलत नाही.

याच टेबलावर एका कोपऱ्यात छोटा हर्मिस बेबी टाईपरायटर. बाजूला स्लाईड्स्‌ची खोकी. हाताशी पेन्सिली, हस्तिदंती मुठीचा चाकू... पाठीमागे स्टुलावर छोटा काळा पंखा... हवा तसा वळवून वापरता येणारा टेबल लॅम्प... या साऱ्या त्यांच्या आत्यंतिक गरजेच्या वस्तू.

खोलीच्या एका कोपऱ्यात जुनी हॅवरसॅक. सालिम अलींच्या पाठीवर बसून केव्हाही भ्रमंतीला निघण्याच्या तयारीत सदैव सज्ज. आणि दुसऱ्या कोपऱ्यात पुस्तकांच्या चौथऱ्या आड जीर्ण, तळवे झिजलेले बुटांचे जोड. त्यांच्या अविरत भ्रमंतीचे साक्षीदार.

खोलीच्या एका भिंतीवर तेहमिनाचे एक जुनं पिवळसर छायाचित्र. दुसऱ्या भिंतीवर मोनालिसाचं रिप्रिंट, हिमालय जेचं चित्र... या पक्षितज्ज्ञाच्या या जगात पेंढा भरलेल्या पक्ष्यांना मात्र अजिबात स्थान नव्हतं.

चार भिंतींत वावरताना सालिम अलींचा नेहमीचा पोषाख म्हणजे साधा पांढरा टी शर्ट, पांढरी हाफ् पॅण्ट. कधी कधी त्या हाफपॅण्टला सावरणारे पट्टे खांद्यावर चढलेले. पायांत साध्या स्लिपर्स. ते सायंफेरीसाठी बाहेर पडत तेव्हा पायात स्लिपर्स ऐवजी कॅन्व्हासचे बूट आणि हातात छोटी छडी असे. बाकी पोषाख तोच.

त्यांचा दिवस पहाटे पाच-साडेपाचलाच सुरू व्हायचा. अगदी पक्ष्यांच्या किलबिलाटाबरोबर. उठल्याबरोबर त्यांना चहा लागे. त्यांची बहीण कमरुन्निसा हयात होती तोपर्यंत तीच चहा करून द्यायची. ती १९७६ मध्ये वारल्यावर हे काम तिची सून करू लागली. पण तिला खास आपल्यासाठी लवकर उठून चहा करावा लागतो हे





लक्षात आल्यावर त्यांनी तिच्याकडून चहा कसा करावा याची दीक्षा घेतली आणि आपला चहा आपणच करून घेऊ लागले. तेहमिना वारल्यानंतर अनेक बाबतींत त्यांना स्वावलंबी बनावं लागलं. परंतु जेवणखाणाच्या बाबतीत त्यांची बहीण काळजी घेई. त्यामुळे त्याचा विचार कधी त्यांना करावा लागला नव्हता. तिच्या पश्चात चहा करून घेऊ लागल्यावर आपल्याला चहाही करता येतो, त्या बाबतीत आपण स्वावलंबी झालो याचाही त्यांना आनंद झाला. अगदी बालसुलभ आनंद.

चहापान झाल्यावर टंकलेखन सुरू व्हायचं. हे काम दिवसभर अन् रात्री उशिरापर्यंत चाले. दोन वेळचं भोजन अन् दुपारची वामकुक्षी सोडली तर बाकीचा सारा वेळ लिखाण, टंकलेखन, मुद्रितं तपासणं यांतच जाई. इतरांपेक्षा त्यांचे कामाचे तास जास्त. त्यामुळे इतरांना काम पार पाडायला वेळ कमी का पडतो हेच त्यांना कोडं असे.

पक्षि मोहिमेवर असतानादेखील शिस्तीची, वेळेची बंधनं सैलावत नसत. तिथेही घड्याळाचा काटा तलवारीसारखा मानेवर टांगता.

तिथेही ते भल्यापहाटे साडेचार-पाचलाच उठत. आपला बिछाना आवरून गुंडाळून ठेवत. मग न्याहारी करून पक्षिनिरीक्षणासाठी बाहेर पडत. पक्ष्यांची नि त्यांची उठायची वेळ एकच.

दुपारी बारापर्यंत ही भ्रमंती चाले. साडेबारा ते एक या काळात प्रत्येकाचं जेवण उरकलंच पाहिजे. ही वेळ घरी-दारी-वनी चुकायची नाही.

सर्वांनी एकत्र बसून सारखेच जेवण घ्यायचे. तिथे पंक्तिप्रपंच नाही की आपपर भेदभाव नाही. वाढायला आलेला पदार्थ प्रत्येकापर्यंत पोचलाच पाहिजे. मात्र कोणी आडवा हात मारून जेवायचे नाही.

ते स्वत: मिताहारी. त्यांना भरपेट जेवलेलं कोणीच पाहिलेलं नाही. जेवणानंतर केळं खातानाही अर्ध्या केळ्यासाठी कोणी वाटेकरी आहे का ते पाहून मग केळे उचलत.

त्यांच्या पंक्तीला बसणाऱ्यांना त्यांचा सासुरवासच असे. कोणी जरुरीपेक्षा जास्त खातोयसं दिसलं की त्यांची घालमेल व्हायची. ते नाराज व्हायचे. त्यांची मर्जी राखण्यासाठी काही बहाद्दर वेगळीच शक्कल काढत. जेवणाच्या पूर्वी वा नंतर स्वयंपाक्याच्या संगनमताने मुदपाकखान्यात आपला कोटा पूर्ण करत. मारुती चितमपल्ली मात्र सालिम अलींचेच ऋण मान्य करतात – 'मी सालिम अलींमुळे मिताहारी झालो!'

त्यांच्या पंक्तीला बसणाऱ्याला बरीच अवधानं पाळावी लागत. भरपूर वाढून न घेणे, खाताना तोंडाचा मच्मच् आवाज होऊ न देणं, दातावर चमच्याचा आवाज होऊ न देणं, ताटात उष्टं न टाकणं इ.इ.



रुचकर अन्नाचा आस्वाद घेणं त्यांना आवडे, पण त्यावाचून अडत नसे. कसले चोचले म्हणून नव्हते.

कोंबडीला थाळीत विशेष स्थान. ही पक्षिजात नष्ट होण्याची, दुर्मिळ होण्याची भीती नसल्याने तिचं नेहमीच स्वागत. बाकी मांसाहाराच्या बाबतीत भक्ष्याभक्ष्य नव्हतं. डुकराचं मांस ही 'रेडचिकन' म्हणून चाले.

फळं तर सर्वच आवडती. पक्षिगणाचं वैशिष्ट्यच ते. मात्र त्यातल्या त्यात देवगडचा हापूस अधिक प्रिय. भारतात आंब्याचा मोसम असताना ते कुठे परदेशी किंवा हिमालयाच्या पर्वतराजीत पक्षि मोहिमेवर असले की देवगड हापूसच्या आठवणीने उसासत. एरवी मिताहारी पण हापूस आंबे मात्र थाळीभर लागत.

मोहिमेवरील भोजनातला महत्त्वाचा घटक म्हणजे लोणचं. सुरुवातीच्या काळातील मोहिमांत तर त्याला अनन्यसाधारण महत्त्व होतं. खास पॅकिंग केलेली लोणच्याची बरणी प्रत्येक मोहिमेत असे.

कॅम्प चालू असतानाही जेवणाच्या वेळा ठरलेल्याच. दुपारी साडेबारा ते एक, रात्री आठाच्या ठोक्याला. मात्र सरहद्दीवरच्या प्रदेशातील पक्षिमोहिमांत त्यांची कधीकधी पंचाईत व्हायची. त्या प्रदेशात अनेक ठिकाणी लष्करी पाहुणचारास सामोरे जावे लागे. अशा प्रसंगी भोजनापूर्वी साऱ्यांच्या हातात मद्याचे चषक असत नि सालिम अलींच्या हातात असे फळांचा रस. सालिमसाहेबांच्या नावाने चांगभलं होऊन पेयपानाला सुरुवात व्हायची... घड्याळाचा काटा नि सालिम अली एकमेकांकडे पाहत असायचे. सालिम अलींची नजर आपल्या मनगटी घड्याळाच्या काट्याकडून भोजनगृहाच्या दिशेने येरझारा घाली... त्यांची भोजनाची नियमित वेळ टळू लागलेली असे... अस्वस्थ चुळबूळ करण्यापलीकडे त्यांच्या हाती काही नसे.

दिवस कसाही जावो, कितीही भ्रमंती झालेली असो वा अशाच एखाद्या मेजवानी-पाहुणचारापायी बरीच रात्र झालेली असो, बिछान्यावर पाठ टेकण्यापूर्वी दिवसभराच्या पक्षिनिरीक्षणाच्या कच्च्या नोंदी पक्क्या नोंदवल्याच पाहिजेत हा त्यांचा दंडक. हा दंडक फार फार पूर्वीपासून ते अखंडितपणे पाळत आले होते. बरोबरीच्या इतरांनाही त्यातून सवलत वा सुटका नव्हती. हा दंडक मोडल्याबद्दल त्यांनी एकदा आपल्या भाच्यालाही उपासमारही घडवली.

'द बर्ड्स ऑफ बॉम्बे ॲण्ड सालसेट' या पुस्तकाची जुळवाजुळव चालू होती. त्या संदर्भात सालिम अली नि त्यांचा भाचा हुमायून अब्दुलअली (वय वर्षं ३०) देवनार परिसरात पक्षि-सर्वेक्षण करत होते. दोघेही वास्तव्याला देवनारमध्येच जाबिरअलींच्या घरी होते.

एके रात्री हुमायून नोंदी पक्क्या करून ठेवायला विसरला. दुसऱ्या दिवशी सालिम





अलींना हे कळलं. त्यांनी त्या दिवशी हुमायूनला पक्षि-सर्वेक्षणासाठी सोबत घेतलं नाही. घराबाहेर पडताना सफियाभाभीला – जाबिरच्या पत्नीला – बजावून गेले, 'याला कोंडून ठेवून बाहेर पडतोय. नोंदी लिहून काढल्याखेरीज जेवायलादेखील द्यायचं नाही याला.'

सालिम अलींचं नोंदी उतरण्याचं काम रात्री साडेदहा-अकरापर्यंत चाले. त्यानंतर पहाटे पाचपर्यंत निद्रा.

निद्रेसाठी आवडतं ठिकाण म्हणजे बंगल्याचं पोर्च. जेव्हा पक्षि-मोहिमेवर नसत, मुंबईत त्यांचं वास्तव्य असे तेव्हा त्यांच्या निद्रेचं ठिकाण म्हणजे बंगल्याचं पोर्च. पावसाळ्यातच काय ते चार भिंतींत ते झोपत.

झोपेच्या बाबतीत मात्र त्यांची काही कडक पथ्यं होती. त्यांतलं सर्वांत कडक पथ्य म्हणजे नीरव शांतता. घोरणारी व्यक्ती त्यांना जवळपासही चालत नसे. ते डेहराडूनमध्ये वास्तव्यासाठी गेले होते त्या काळातली गोष्ट. त्यांच्या शयनगृहाच्या शेजारच्या खोलीत कोणी एक पाहुणा होता. रात्रीची नीरव शांतता भेदून त्याचं घोरणं सालिम अलींच्या कानी पडू लागलं. ते त्यांना इतकं असह्य झालं की ते आपला बाडबिस्तरा उचलून बंगल्याच्या पोर्चमध्ये जाऊन झोपले. तिथेही घोरणं पाठ सोडीना म्हणून मग सरळ अंगणातल्या एका झाडाखाली पथारी टाकून रात्र काढली.

मोहिमांवर, दौऱ्यावर असताना स्वतंत्र शयनगृह मिळणार नसलं तर ते इयरप्लगचा वापर करत. परदेशी जातानाही त्यांच्या सामानात आठवणीने इयरप्लग समाविष्ट केलेला असे.

नंतरनंतरची काही वर्षं त्यांना डाव्या कानाने ऐकू येत नसे. अवतीभवतांच्या खोल्यांतून फार गोंगाट असला की उजव्या कुशीवर झोपून गोंगाटाकडे डावा कान करत.

उत्तर आयुष्यात श्रवणशक्ती फारच क्षीण झाली तेव्हा ते श्रवणयंत्र वापरू लागले. या यंत्रामुळे पक्ष्यांचे आवाज आपण पूर्वीप्रमाणेच नीट ऐकू शकतो या आनंदात भर पडली होती ती ते यंत्र बंद करता येते या सुविधेची. गोंगाटापासून, मूर्ख माणसाच्या वटवटीपासून आपलं रक्षण करता येतं हा आनंद विशेष!

आत्यंतिक वक्तशीरपणा हा सालिम अलींच्या शिस्तीतला महत्त्वाचा घटक. ते स्वत: सर्व वेळा तर पाळायचेच पण इतरांनीही त्या पाळाव्यात म्हणून त्यांचा आग्रह असे. त्यांच्या वक्तशीरपणाचा धाक एवढा की त्यांना भेटायला जाणारे त्यांचे परिचित ठरल्या वेळेआधीच पाच मिनिटं हजर राहण्याची काळजी घेत. ते कोणाला भेटायला जाणार असले तर ती व्यक्ती, मग ती सरकारी असो की बडी असामी, घड्याळावर नजर ठेवून हुश्शार असायची.



त्यांच्या तारुण्यात, म्हणजे अगदी पंचाहत्तरीपर्यंत ते वेळ न पाळणाऱ्याबाबत, ठरल्यावेळी काम पूर्ण न करणाऱ्याबाबत कमालीचे असहिष्णू होते. त्यांच्या जमदग्नी अवताराच्या अनेक कथा प्रसिद्ध आहेत.

१९५३-५४ मधली एक कहाणी. त्या वेळी त्यांचे मदतनीस होते वेणूगोपाळ. या वेणूगोपाळांना पोस्टाचे स्टॅम्प्स जमवण्याचा नाद होता. सालिमसाहेबांना देशोदेशींची पत्रं येत. त्यांचे स्टॅम्प्स् ते वेणूगोपाळांना द्यायचे. या वेणूगोपाळांना एकदा एका विचित्र तऱ्हेने सालिमसाहेबांच्या रागाला 'डोकं' द्यावं लागलं.

शनिवारचा दिवस. एक पत्र तातडीने रवाना करण्यासाठी म्हणून सालिम अलींनी त्यांच्या हाती सोपवलं. शनिवारी पोस्ट ऑफिस अर्धवेळच असणार याचं स्मरण देऊन वेळीच ते पोस्टाच्या पेटीत टाकायला निक्षून बजावलं.

पण वेणूगोपाळ विसरले. रविवार गेला. सोमवारी सकाळी कार्यालयात आल्याआल्या तरी त्यांनी ते पोस्टात टाकावं!... तर तेही राहून गेलं. ते पत्र तसंच टेबलावर. सोमवारी सकाळी दहा वाजता कार्यालयात प्रवेशल्याप्रवेशल्या सालिमसाहेब वेणूगोपाळांच्या टेबलाच्या दिशेने गेले. शनिवारी पत्र पोस्टात पडलं की नाही याची चिंता त्यांना होतीच.

वेणूगोपाळांच्या टेबलाशी येताक्षणी त्यांच्या नजरेनं ते पत्र टिपलं... त्यांचा राग अनावर झाला... त्यांनी टेबलावरची शाईची दौत उचलली नि सरळ वेणूगोपाळांच्या डोक्यावर उपडी केली. मग ताड् ताड् निघून गेले.

सहकाऱ्यांनी वेणूगोपाळांना दोन दिवस रजा घेऊन नजरेआड राहायला सांगितलं. त्या कालावधीत दुर्वासमुनी निवळतील असा कयास.

तिसऱ्या दिवशी वेणूगोपाळ कामावर आले. आपल्या टेबलाशी बसून काम पाहू लागले. घड्याळाच्या काट्याबरोबर सालिमसाहेब कार्यालयात आले. आल्या आल्या त्यांनी वेणू गोपाळांना बोलावून घेतलं. गेल्या दोन दिवसांत बरेच पोस्टल स्टॅम्प्स् जमा झाले होते. ते त्यांनी वेणूगोपाळांच्या हाती दिले. दोन दिवसांपूर्वी जणू ते रागावलेच नव्हते.

कुठे प्रवासाला जायचं असलं, गाडी गाठायची किंवा विमान पकडायचं असलं की त्या दिवशी ते कमालीचे अस्वस्थ असत. विमानतळावर किंवा रेल्वे स्थानकावर जरुरीपेक्षा अर्धा तास आधीच हजर. एकदा आपल्या आसनावर स्थानापन्न झाले की मग त्यांची अधीरता, बेचैनी संपे.

पक्षिनिरीक्षण मोहीम ठरली की आधी महिना दोन महिने त्यांची धावपळ बघायला नको. पत्रव्यवहार तर अगदी युद्धपातळीवरून चाले. सहकाऱ्यांना, मदतनिसांना कामं नेमून देणं, कामांच्या प्रगतीचा आढावा घेणं... सूचनापत्रं... स्मरणपत्रं... फतवे. कागद इकडून तिकडे वेगाने फिरत असायचे. जे सामान बांधून तयार असे त्याचीही पुन्हा पुन्हा





तपासणी व्हायची. सामानाच्या याद्या तयार असत. सुईदोरा, विजेरीच्या बल्बपासून सर्व गोष्टींचा त्यात समावेश असे. त्या याद्यांबरहुकूम सामान घेतलं गेलंय की नाही याची ते जातीनं खात्री करून घ्यायचे.

ज्या स्टेशनवॅगनमधून मोहिमेवर निघायचं तिची तंदुरुस्तीही ते स्वतः पाहत. तपासून खात्री करून घेत. सगळं एकट्याने निभवायचं, जंगलात आपल्या अडचणी आपल्यालाच सोडवायच्या असतात या पूर्वानुभवांमुळे ते नेहमीच दक्ष, सावध. त्यांचा एकूण कारभारच आखीवरेखीव, काटेकोर.

वस्तूंच्या वापराबाबतही त्यांची तीच कठोर शिस्त. ते सहसा आपली वस्तू दुसऱ्याला वापरायला देत नसत. मग ती वस्तू म्हणजे त्यांचा टिन ओपनर असो की स्टेशन वॅगन.

त्यांच्या एकहाती वापराने, योग्य निगराणीने त्या वस्तू आपल्या मालकासारख्याच कायम तंदुरुस्त, दीर्घायुषी. तिसाव्या वाढदिवशी तेहमिनाने त्यांना मॉसर बंदूक दिली. तीच ते शेवटपर्यंत वापरत. इतर कोणी तिला हाताळलंच तर 'दस्त्याला धर, नळीला धरून वागवू नकोस' म्हणून सक्त ताकीद मिळायचीच. दुर्बीण, कॅमेऱ्याच्या बाबतीतही तेच. ओला हात लावायचा नाही. भिंगं स्वच्छ करायची, तीही स्वच्छ मऊ सुती कपड्याने. वापरून झाल्यावर ती स्वच्छ पुसून जागेवर ठेवायची.

वस्तू नेमक्या जागी सापडली नाही की त्यांचं पित्त खवळे. वस्तू काही तिची जागा सोडत नाही. मग ती जागा बदलतेच कशी! अशी जागा बदलणे म्हणजे अक्षम्य गुन्हा.

उत्तर आयुष्यात त्यांना रात्री वारंवार लघवीसाठी उठावं लागे. मोहिमेवर असताना रात्री त्यांना हाताशी विजेरी लागे. त्यामुळे त्यांच्या विजेरीला कोणी हात लावायचा नाही असा दंडक. कोणी एकदा ती आगळीक केली. तेव्हा त्याला वणव्यात होरपळूनच निघावं लागलं. हो, त्यांच्या विजेरीला एक छानसं गलोतंही असे – जुन्या जीर्ण मोज्याचं.

आपल्या वस्तूंविषयी त्यांना किती प्रेम होतं, हे त्यांनी आत्मचरित्रात एका चाकूच्या निमित्तानं सांगितलंय. अनेक वर्षं सोबत करणारा त्यांचा चाकू कैलास-मान सरोवराच्या पक्षियात्रेत एका विसाव्याच्या ठिकाणी अनवधानाने राहिला. थोडं पुढं चालू गेल्यावर त्यांना चाकू खिशात नसल्याचं लक्षात आलं. त्याच्या शोधात त्यांनी पुन्हा तास दोन तासांची, डोंगर चढउताराची, वाट कापली नि चाकू ताब्यात घेतला. पुन्हा मार्गस्थ झाले.

सिक्कीमच्या (१९५५) पक्षि-सर्वेक्षण मोहिमेत अशाच एका अवघड ठिकाणी ते आपला चष्मा विसरून आले. तळावर परतल्यावर त्यांच्या ते लक्षात आलं. ते आल्या



पावली परत फिरले. चार-सहा मैलांची चाल करून ज्या ज्या ठिकाणी विसावले होते, त्या त्या ठिकाणी त्याचा शोध घेतला नि परतले ते चष्मा घेऊनच.

त्यांच्या वस्तू जपण्याच्या, दीर्घकाळ वापरात टिकवण्याच्या शिस्तीतून काहीकाही वेळा मजेशीर प्रसंग घडत आणि मग 'खरंच, वस्तू नीट जपल्या पाहिजेत' हे त्यांचं म्हणणं अधिकच प्रत्ययकारी ठरे.

त्यांच्या अभ्यासिकेतला तो छोटा काळा पंखा एकदा नादुरुस्त झाला. अनेक वर्षं तोही त्यांच्यासारखाच सातत्यानं फिरत असणार. शेवटी थकलाच. एका तंत्रज्ञाला त्यांनी त्याची दुरुस्ती करायला सांगितली. पंखा दुरुस्तीचा खर्च आला रुपये पंचवीस. तो भयंकर आकडा पाहताच सालिम अली आश्चर्याने उद्‌गारले – 'कमाल आहे! तो पंखा मी घेतला होता अवघ्या पाच रुपयांना... किमतीपेक्षा पाच पट दुरुस्तीचा खर्च!... याचा अर्थ जुन्या वस्तू नीट जपल्याच पाहिजेत!'

आणि अशा कितीतरी जपून वापरून जीर्णशीर्ण झालेल्या वस्तू त्यांच्या संग्रहात होत्या. हातमोज्यांचे पायमोज्यांचे जोड, टोप्या, जुनी पेने, शर्ट्स... काही म्हणून टाकून द्यायचं नाही.

मात्र आपलीच तेवढी वस्तू जपायची असा खाक्या नव्हता. आस्था सारखीच. तीच. अगदी पक्षि मोहिमेवर असतानाही सोसायटीच्या वस्तू वापरताना त्यांचा हाच कटाक्ष. कॅम्पकॉटचीच गोष्ट. तिच्या वापराबाबतचे नियम सर्वांना सारखेच. मग तो आपला विद्यार्थी असो की परदेशी पाहुणा असो. कॅम्पकॉटचा उपयोग फक्त झोपण्यासाठी, बसण्यासाठी नाही. तिच्या कडेवर बसून गप्पा ठोकायच्या नाहीत. तसं केलं की कॉटचं तिथलं कापड झिजून फाटतं. म्हणून हा दंडक...

गोंधळ, गडबड, धांदल हेही शब्द त्यांच्या कोशात नव्हते. कमालीची शिस्त अन् जाणीवपूर्वक आत्यंतिक काटेकोरपणा हे त्यांचे खास स्वभावविशेष. इंग्रजांच्या जमान्यात वरच्या वर्गात वावरायला मिळाल्यामुळे असो की त्यांच्या उपजत वृत्तीमुळे असो; त्यांच्या कामात, वागण्यात, उठण्याबसण्यात, खाण्यापिण्यात जराही बेशिस्त, ढिलाई वा गाफीलपणा यांचा अंशही नसे. सगळं कसं आखीव-रेखीव, टापटीप, चटपटीत. कुठलाही घोळ न घालता. प्रत्येक काम त्यांना मनापासून केलेलं हवं असे. निष्काळजीपणा, चुकारपणा, चालढकल त्यांच्या स्वभावात नसल्याने इतरांना त्याची सवलत नव्हती. त्यांच्या सहकाऱ्यांनी, विद्यार्थ्यांनी हातावेगळं केलेलं काम, लिहिलेला अहवाल, निरीक्षणं ते पुन्हा पुन्हा तपासून त्याच्या निर्दोषत्वाची खात्री करून घेत. स्पेलिंगची साधीशी चूकही खपत नसे. सरळ फाईल भिरकावली जायची.

इंग्रजी भाषेवर त्यांचं आत्यंतिक प्रेम. तिची हयगय त्यांना खपत नसे. शेवटपर्यंत त्यांच्या हाताशी इंग्रजी शब्दकोश होता. त्याचा वापर कधीच संपला नाही.





सुंदर अक्षराविषयी त्यांना आदरमिश्रित कौतुक. त्यांचं स्वत:चं इंग्रजी नि उर्दू हस्ताक्षर विलक्षण सुंदर होतं. कोरून अक्षर काढण्यात त्यांना मनस्वी आनंद व्हायचा. नेहमीच्या पक्षिनिरीक्षण नोंदीही ते कोरीव अक्षरात टिपायचे. सावकाशीनं एक एक अक्षर वळणदारपणे उमटवत ते लिहायचे. त्यांच्या अक्षराचं वळण अगदी शेवटपर्यंत कायम होतं. अगदी नव्वदीत त्यांचा हात थरथरू लागला तेव्हाही ते स्वाक्षरी करताना तिच्यात फरक पडू नये म्हणून कमालीची काळजी घेत.

त्यांच्या या अक्षरप्रेमाचा झणझणीत अनुभव अनेकांनी घेतलाय.

एम.एससी.च्या अभ्यासक्रमासाठी नाव नोंदवायला म्हणून रॉबर्ट ग्रब सोसायटीत मुलाखतीला हजर झाले. विद्यार्थी पारखून घ्यायला मुलाखतीच्या वेळी सालिमसर जातीनं हजर होते. त्यांनी पहिलाच प्रश्न ग्रबना विचारला – "तुझं अक्षर कसंय?" रॉबर्ट ग्रब यांचं अक्षर सुवाच्य होतं, पण सुंदर नव्हतं म्हणून ते उत्तरले "सुंदर नाही." हे उत्तर ऐकताच सालिमसाहेबांनी मुलाखत घ्यायला बसलेल्या आपल्या सहकाऱ्यांकडे तीव्र कटाक्ष टाकला नि त्यांना फटकारलं – "कोणालाही दाखल करून घेण्याआधी, समक्ष बोलावण्याआधी त्याच्या हस्ताक्षराविषयी खात्री करून घेण्याची गरज वाटली नाही का?"

कोणत्याही प्रकारची अस्वच्छता त्यांचा मस्तकशूळ उठवी. टेबलावर उमटलेली चहाच्या कपाची वर्तुळेसुद्धा त्यांचा पारा चढवायला पुरत.

त्यांच्या टेबलावर चहाचा कप नुसता ठेवलेला खपत नसे. त्याखाली रबरी चकती हवीच. ती जागेवर नसली तर कागदाचा तुकडा त्याखाली सरकवत आणि चहा पिऊन पाहुणा गेला की रबरी चकती कुठे गायब झाली म्हणून चपराशाला फैलावर घेत.

आचारातली स्वच्छता, शुद्धता त्यांच्या वाणीतही होती. ते प्रसंगी रागवत, चिडत, संतापत पण म्हणून कधी अपशब्दांचा विटाळ जिभेला होऊ दिला नाही आणि त्या बाबतीत इतरांची आगळीकही सहन केली नाही. वेडीवाकडी भाषा वापरणाऱ्या एका ड्रायव्हरची त्यांनी चांगलीच खोड मोडली. ते विमानतळावरून घरी परतत असताना कोणत्या टॅक्सीत त्यांनी बसावं यावरून दोन ड्रायव्हरांत बाचाबाची झाली. सालिम अली टॅक्सीत बसले होते तिच्या ड्रायव्हरने दुसऱ्याला अपशब्द वापरले. मुक्कामावर पोहोचताच त्यांनी पोलीस आयुक्तांना फोन करून त्या टॅक्सीचा नंबर कळवून तक्रार नोंदवली. त्याचा मोटार चालकत्वाचा परवाना एका महिन्यासाठी रद्द झाला.

ख्यातकीर्त झाल्यावर, सरकार दरबारी वजन वाढल्यावर त्यांचं नाव चर्चिलं जाऊ लागल्यावर ते असे कडक शिस्तीचे झाले होते अशातला भाग नाही. हा त्यांचा स्वभाव



मूळचाच. अगदी १९१९-२० साली ते 'कोणी' नव्हते तेव्हाही असेच होते. वृद्ध अदनान फतेहअलींना त्या प्रसंगाची चांगलीच आठवण आहे–

अदनान फतेहअली हे सालिम अलींचे आतेभाऊ. त्यांचा विवाह सालिमसाहेबांच्या पुतणीशी झाला. हे नवपरिणित जोडपं त्या वेळी पार्ल्याला राहत होतं. त्या काळी चर्चगेट ते विरार हा प्रवास बी.बी.सी. आय. रेल्वेने व्हायचा. साप्ताहिक सुट्टीत सालिम अली पार्ल्याला यायचे. एके रविवारी गाडी पकडताना त्यांची थोडी धावपळ झाली. चर्चगेट स्टेशनवरून गाडी सुटतासुटता ते तिथं पोचले. तिकीट काढायला सवड नव्हती म्हणून तसेच गाडीत चढले.

गाडी पार्ल्याला फलाटाला लागताच तिकीटतपासनिसाला शोधत सालिम अली त्याच्यासमोर हजर झाले. आपण विनातिकीट प्रवास केल्याचे सांगितले. तिकीटतपासनिसाने दुप्पट आकार लावून त्यांना दंड फर्मावला. तो सालिमसाहेबांनी तत्काळ अमान्य केला. एकेरी आकार भरायच्या तयारीने ते त्याच्यासमोर आले होते. कोणी त्यांना हटकले वा पकडले होते म्हणून नव्हे, तर सदसद्‌विवेकबुद्धीला स्मरून ते हजर झाले होते. पण दोघंही आपापल्या भूमिकांवरून जराही हलायला राजी नव्हते. शेवटी, हा प्रवासी आपल्याला दाद देत नाहीसे दिसल्यावर तो तपासनीस त्यांना एकेरी भाडे भरा म्हणाला. पण आता सालिम अलींनी तेही नाकारलं. 'तुमच्या सोयीनुसार मी वागणार नाही. तुमच्या वरिष्ठ कार्यालयातच याचा काय तो निकाल लावीन' म्हणाले.

दुसऱ्या दिवशी घरी परतल्यावर (त्या वेळी ते मामांच्या घरी खेतवाडीत होते) त्यांनी रेल्वे खात्याकडे रीतसर तक्रार नोंदवली. भरपूर पत्रव्यवहार झाला. आपलं म्हणणं कसं योग्य आहे ते पटवून दिलं. रेल्वेने ते मान्य केलं. मग त्यांनी एकेरी भाडं रेल्वेच्या दप्तरी जमा केलं.

प्रश्न पैशाचा नव्हता. प्रश्न होता शिस्तीचा. तत्त्वाचा.

पैसा हे सालिम अलींचं अंतिम ध्येय कधीच नव्हतं. अगदी सुरुवातीच्या काळातही ते तसं नव्हतं. १९३५ च्या सुमारास काटकसरीनं थोडक्या पैशात जगता यावं म्हणून ते सपत्नीक डेहराडूनला गेले आणि तिथेही नोकरी-चाकरी, व्यापार-उदीम न करता, पोटापाण्याची काळजी न घेता आपला मेव्हणा पक्ष्यांमागेच हिंडतोय हे डॉ. अलमा लतिफींना-तेहमिनाच्या बंधूंना – समजलं तेव्हा त्यांना फार वैषम्य वाटलं.

आपल्या मेव्हण्याला कुठंतरी चांगल्या ठिकाणी लावावं असं त्यांच्या मनात असतानाच त्यांना खंबायतच्या नबाबाला एक खाजगी सचिव हवाय असं समजलं. त्यांनी तातडीने सालिम अलींना तार करून लाहोर मुक्कामी मुलाखतीसाठी यायला कळवलं. परंतु त्या वेळी सालिम होते काश्मीरमध्ये पक्षि-मोहिमेवर. पंधरा दिवसांनी ते डेहराडूनला परतले तेव्हा त्यांना ती तार मिळाली. तोवर नबाबसाहेबांचा मुक्काम





लाहोरातून हलला होता.

सालिम अलींनी डॉ. लतिफींना पत्र पाठवून कळवलं की अजूनही आपण मुलाखतीला जावं असं वाटत असेल तर नबाबाने कामाचे स्वरूप, अटी, पगार वगैरे कळवावे. या पत्राला उत्तर आलं नाही.

नंतर सालिम अलींनी तेहमिनाच्या बहिणीला – सलिमा हिला – पत्र पाठवून आपण मुलाखतीस उपस्थित का राहू शकलो नाही ते कळवलं. पुढं लिहिलं होतं – (२६.८.३६) Our future plans are as uncertain and nebulous as ever. There are, as usual, a number of things in the air, all of a more or less temporary and Ornithological nature, but whether any of them will come to anything still remains to be seen. One has to wait and wait and go on waiting...

पुढे सालिम अलींच्या लेखणीनं त्यांची आर्थिक स्थिती सुधारली. कर्जाचा डोंगर उतरवला. आणि नंतरच्या काळात पुस्तकांच्या रॉयल्टीतूनच त्यांनी पक्षि-अभ्यासासाठी, निसर्ग संरक्षणासाठी सोसायटीत निधीही उभारले.

सोसायटीला पैसा दिला. सोसायटीसाठी पैसा जमवला आणि तो कसा खर्च करावा याचा आदर्शही घालून दिला. पैशापाठी ते धावले नाहीत पण त्याची किंमत त्यांना होती. त्यामुळेच त्याच्या वापराबाबत ते अत्यंत काटेकोर होते. एकाएका रुपयाच्या हिशेबासाठी ते सोसायटीच्या खजिनदाराला छेडत. स्वत:ची खात्री पटवून घेत आणि मगच जमाखर्चावर सही देत.

सुरुवातीच्या काळातल्या त्यांच्या पक्षि-सर्वेक्षण मोहिमा शेकड्यांत नाहीतर हजारांत पार पडत. पण हाच खर्च १९७०-८० च्या काळात लाखाच्या घरात जाऊ लागला. हे प्रचंड आकडे पाहिले की ते बेचैन होत. एवढा निधी उभारायचा कसा म्हणून चिंताक्रांत होत आणि तो तसा उभा राहिल्यावर त्याची पै न् पै नीट वापरली जाईल की नाही म्हणून शंकाकुल होत.

१९८० सालातली एक हकीकत. उत्तर भारताचा दौरा संपवून ते मुंबईला परतले. त्यांना विमानतळावर उतरून घ्यायला सोसायटीची गाडी घेऊन डॉ. ग्रब गेले. संध्याकाळची वेळ. मुंबईचे रस्ते वाहनांनी तुडुंब भरून वाहत होते. ही गर्दी टाळण्यासाठी डॉ. ग्रबनी ड्रायव्हरला गाडी माहिम कॉजवे वरून बांद्र्याला घ्यायला सांगितली. सालिम अलींना हा रस्ताबदल मुळीच रुचला नाही. कारण नेहमीच्या मार्गापेक्षा हे अंतर तीन एक किलोमीटर्सनं अधिक म्हणजे तेवढं पेट्रोल अधिक लागणार. डॉ. ग्रबचं म्हणणं, थोडंसं अंतर वाढल्यानं आणि त्यापायी रुपये-दोन रुपये अधिक खर्चले गेल्यानं जर प्रवास सुखाचा होणार असेल तर तेवढी सवलत घ्यायला काय हरकत आहे!

'पण निष्कारण सोसायटीला हे रुपये-दोन रुपये अधिक खर्चावे लागणार त्याला



माझी हरकत आहे. थोडीशी अडचण सोसून रुपये दोन रुपये वाचणार असतील तर ते अधिक श्रेयस्कर' – इति सालिम अली.

गेल्या काही वर्षांत सोसायटीला मिळणारी अनुदानं वाढलीत. मोठे मदतनिधी मिळाले. 'ही आजकालची तरुण पोरं एवढ्या पैशाचा कारभार व्यवस्थित पाहतील ना! त्यांना हे नीट झेपवता येईल ना?' म्हणून त्यांच्या जिवाला घोर लागे.

त्यांची स्वत:ची राहणी अतिशय साधी. गरजाही कधी त्यांनी वाढू दिल्या नाहीत. कपडाही जरुरीपुरताच घ्यायचा. त्यांची दुरुस्तीही स्वहस्तेच करायची. मोहिमेवर निघताना बरोबर साबणाच्या वड्या घ्यायच्या पण त्या अर्ध्या अर्ध्या कापून वापरायच्या म्हणजे मग विनाकारण झीज व्हायला नको. सुटी नाणी, जुनी पेने ठेवायला एक वेगळा डबाच असे. काही फेकून द्यायचं, टाकून द्यायचं नाही. कधी कोणत्या गोष्टीची गरज पडेल ते सांगता येत नाही म्हणून मग सर्व वस्तू नीट वर्गवारी करून ठेवायच्या. पैशासाठी ते जगले नाहीत पण जगण्यासाठी पैसा लागतो याचा अनुभव त्यांच्या गाठी होताच. त्यामुळे कोणत्याही वृथा खर्चाला त्यांचा आक्षेप.

एखाद्या सभेसाठी, सेमिनारसाठी किंवा परदेशी तज्ज्ञांच्या भेटीगाठीसाठी पंचतारांकित हॉटेलात जाण्याचा, तिथल्या मेजवान्यांत सहभागी होण्याचा प्रसंग त्यांच्यावर अनेकदा यायचा. तिथले भारी किमतीचे एकेक पदार्थ पाहिले की ते अस्वस्थ व्हायचे. म्हणायचे – 'माझं लक्ष आपलं मेनू कार्डावर. एक एक थाळी म्हणजे माझ्या शिपायाचा पगार!'

आपल्या नोकराचाकरांचा त्यांना कधीच विसर पडला नाही. चपराशी, ड्रायव्हर, माळी... साऱ्यांना सणासुदीला पोस्त मिळे. एवढंच नव्हे तर त्या प्रत्येकाला त्यांच्या मृत्युपत्रान्वये काही ना काही मिळालंही.

सालिम अलींच्या आनंदयात्रेत, या पक्षियात्रेत बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटी आणि त्यांचे विद्यार्थी यांनाही अनन्यसाधारण महत्त्व आहे. सोसायटी म्हणजे तर त्यांच्या आयुष्यातलं एक खास प्रकरण. त्यांचे बहिश्चर प्राण.

वयाच्या दहाव्या वर्षी त्यांनी सोसायटीत प्रथम पाय ठेवला. नंतरच्या काळात त्या सोसायटीची धुरा वाहण्याचं काम त्यांनी आयुष्यभर केलं.

१९२७-२८ च्या काळात ते सोसायटीचे सहायक क्युरेटर होते. तिच्या जर्नलचे संपादक होते. नंतर ते मानद चिटणीस आणि शेवटी तिचे अध्यक्षही झाले.

स्वातंत्र्योत्तर काळात सोसायटीचे ब्रिटिश आश्रयदाते मायदेशी गेल्यानंतर सोसायटीची आर्थिक बाजू लंगडी पडली. तिचा कारभार डबघाईला आला. अशा वेळी तिला सावरण्याची, नावारूपाला आणण्याची कामगिरी सालिम अलींनी पार पाडली. या कामात पंडित नेहरूंची त्यांना फार मदत झाली.





१९४७ साली सोसायटीच्या कारभाराची सूत्रं हाती घेतल्यापासून सालिम अली सोसायटीचे एक अविभाज्य अंगच बनले. सोसायटीच्या जर्नलचेही ते संपादन करत. कोणत्याही कामाबद्दल वेतन वा मानधन न घेता त्यांनी तिचा कारभार सांभाळला. तिचं कार्यक्षेत्र वाढवलं. विविध उपक्रम योजून ते अमलात आणून तिला ख्यातकीर्त केली. उत्तर आयुष्यात त्यांना नाना पुरस्कार लाभले. त्यापोटी मिळालेलं मानधनही त्यांनी सोसायटीच्या उत्कर्षासाठी वेचलं. उभ्या हयातीत त्यांचे सात-आठ लाख रुपये तरी सोसायटीच्या कारणी लागले असतील. एका मुलाखतकाराने त्यांना त्यांच्या सोसायटीप्रेमाविषयी प्रश्न केला तेव्हा ते उत्तरले – 'काही लोक रुग्णालयांना, धर्मादाय संस्थांना देणग्या देतात... सोसायटीशी मी आज कित्येक वर्षं बांधला गेलोय... मला मूलबाळ नाही. एवढ्या पैशांचं मी काय करू! या भूमीवर पक्षि विज्ञानाच्या भवितव्यासाठी, पक्षि-अभ्यासकांचा वारसा चालू राहण्यासाठी माझा पैसा कारणी लागतोय याचं मला समाधान वाटतं... कृतार्थता वाटते.'

आपण काय करत आहोत, का करत आहोत याचं भान त्यांना शेवटपर्यंत होतं. भाबडा आशावाद तर कधीच नव्हता. अत्यंत जागरूकतेनं, डोळसपणे त्यांनी आपल्या कार्याची आखणी केली. आयुष्याची दिशा ठरवून घेतली. हा मार्ग रुळलेल्या मार्गापेक्षा वेगळा होता. दूरचा होता. एकाकी होता. पण सालिम अलींच्या प्रयत्नांचं सातत्य एवढं की त्यांना त्याच्या आयुष्यातच त्या प्रयत्नांना फुललेलं, फळलेलं पाहायला मिळालं.

सोसायटीत त्यांनी अनेक उपक्रम सुरू केले. राबवले. निसर्ग अभ्यास, निसर्ग संरक्षण, पर्यावरण संतुलन या बाबतींत सोसायटीद्वारे सुरू केलेले लोक-जागृतीचं कार्य तर विशेषच. अशा उपक्रमांना, प्रगत अभ्यासक्रमांना आर्थिक अडचणी सोसाव्या लागू नयेत म्हणून त्यांनी पदरचे पैसे गुंतवून सोसायटीत 'सालिम अली निसर्ग संरक्षण निधी', 'सालिम अली–लोक वान थो पक्षिशास्त्र संशोधन निधी' उभारले.

सालिम अलींच्या अविरत प्रयत्नांचं फळ म्हणजे मुंबई विद्यापीठाने सोसायटीला पदव्युत्तर अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी १९५७ साली दिलेली मान्यता. एम.एससी. आणि डॉक्टरेटचा अभ्यासक्रम सोसायटीत सुरू झाल्यावर सालिम अलींचं काम अधिकच वाढलं.

आपल्या संस्थेतून पदवी धारण करून बाहेर पडणारा विद्यार्थी हा 'सालिम अलींचा विद्यार्थी' म्हणून ओळखला जाणार. त्याने कुठल्याही बाबतीत उणं, डावं असता नये म्हणून ते कमालीचे दक्ष. त्याचं संशोधन, लेखन सारं कसं निर्दोष हवं. त्यामुळे ते आपल्या विद्यार्थ्याला जराही ढिलाई करू देत नसत, गाफील राहू देत नसत. कठोर शिस्तीखाली ते त्याचा अभ्यासक्रम पूर्ण करून घेत. त्याच्या नोंदी टिपणांची कठोर चिकित्सा करत.



कठोर शिस्तीला कसलाच पर्याय नव्हता. आत्यंतिक काटेकोरपणा, जास्तीत जास्त अचूकता ही तर त्यांच्या कामाची बैठक. ही बैठक आपल्या विद्यार्थ्यांकडूनही विस्कटू नये, मलिन होऊ नये म्हणून नेहमीच सावध. सतर्क.

त्यांनी स्वत: अत्यंत कष्टपूर्वक ज्ञानसाधना केली. साधनांच्या कमतरतेचा किंवा सुखसोयींच्या अभावाचा बाऊही कधी केला नाही. त्यामुळे इतरांच्या कष्टांत, प्रयत्नांत उणीव दिसली की ते चिडत. अडचणीविषयी कोणी कुरकुरू लागलं की त्याला दटावत.

आपल्या देशाची आर्थिक स्थिती पाहता आधुनिक उपकरणांचा आग्रह परवडणारा नाही नि त्यावाचून काही अडणारही नाही. अडतं ते फक्त कार्यावरील निष्ठेच्या अभावामुळे, असंही मत ते नेहमी बोलून दाखवत. आपल्या कार्यावर निष्ठा असणारा विद्यार्थी त्यांना प्रिय होता तो यामुळेच.

त्यांच्या हाताखाली शिकणाऱ्या किंवा त्यांच्या समवेत काम करणाऱ्या व्यक्तीला पहिली चूक नेहमीच माफ. मात्र त्या चुकीची पुनरावृत्ती अक्षम्य ठरे. त्यात पुन्हा चूक प्रामाणिकपणे कबूल केली तर थोडक्यावर निभावायचं. एरवी आगपाखडच. पण तो ज्वालामुखीही लवकरच शांत व्हायचा.

त्यांचा परखड स्वभाव नि क्षमाशील वृत्ती अनुभवलेले, त्यांच्या सहवासात पंचवीस-तीस वर्षं काढलेले त्यांचे विद्यार्थी आजही त्यांच्याविषयी आदराने भरभरून बोलतात. आत्मीयतेने रुद्ध होतात. त्यांनी आपल्या अभ्यासाला, संशोधन-कार्याला कशी शिस्त लावली ते अपूर्वाईने सांगतात.

त्यांच्या सहकाऱ्यांच्या, विद्यार्थ्यांच्या मागे त्यांच्या शिस्तीचा बडगा होता, पण आपल्या गुरूची चूक त्याच्या नजरेस आणून देण्याचं त्यांचं स्वातंत्र्य अबाधित होतं. निर्देशनास आणून दिलेली चूक कबूल करण्याची खिलाडू नि प्रामाणिक वृत्ती गुरूच्या ठायीही होती.

फुलचुखे पक्षी हवेत झेपावून कीटक पकडतात असं विधान प्रभाकर सोमणांनी केलं. सालिमसाहेबांनी ते खोडून काढलं. परंतु हे दोघे पुढे भूजला पक्षिनिरीक्षणार्थ गेले असता एका पाणथळ जागी पंचवीस-तीस फुलचुखे (Sunbirds) हवेतील कीटक टिपताना आढळले. सालिम अलींनी आपली चूक नुसती मान्यच केली नाही तर हॅण्डबुकाच्या दहाव्या खंडात ह्या सवयीचा नवा शोध सोमणांच्या नावे नोंदवला.

भरतपूरच्या अभयारण्यात एक पक्षी ओळखताना सालिम अलींची गफलत झाली. ती चूक तिथल्या फॉरेस्ट गार्ड हुकूमसिंगने लागलीच त्यांच्या निदर्शनास आणली. सालिम अलींनी पुन्हा दुर्बीण लावली. निरीक्षण केलं. आपली खरोखर गफलत झाली होती हे लक्षात येताच ती तात्काळ मान्यही केली.





स्वत:चं सारं काटेकोरपणे पार पाडण्याची वृत्ती आणि समोरच्या व्यक्तीच्या वकुबाबद्दल मनात नेहमीच संशय त्यामुळे कोणतीही कामगिरी इतरांवर सोपवताना ते कमालीचे दक्ष नि सावध असत, मग तो विद्यार्थी असो की आप्त.

त्यांचे भाचे कॅ. नादीर तय्यबजी भारतीय नौदलातून १९६१-६२ च्या सुमारास निवृत्त झाले. त्याच वर्षी ते सालिम अलींसमवेत भरतपूरला पक्ष्यांना कडी चढवण्याच्या उपक्रमात सहभागी व्हायला गेले.

पन्नाशीला आलेल्या आपल्या भाच्याला त्यांनी सक्त ताकीद दिली. त्याने पक्षी जाळ्यातून काढायचा नाही. कारण पक्षी जाळ्यातून अलगद काढायचे असतात. त्यांना दुखापत होता नये. कडी चढवून मुक्त केले की त्यांना नीट उडता आलं पाहिजे. तेव्हा 'तू काही दिवस नुसतं पाहा आणि मग पक्षी जाळ्यातून सोडव,' असं त्यांनी नादीरला बजावलं.

चारपाच दिवस झाले... न राहवून एके दिवशी सकाळी नादीर तय्यबजींनी पंचवीस पक्षी जाळ्यातून सोडवले. सालिममामूंना हे समजलं मात्र! अग्निवर्षावाला तोंड देण्याखेरीज नादीरच्या हाती काहीच नव्हतं.

फिल्डवर्क चालू असे तेव्हा प्रत्येक विद्यार्थ्याने किमान शंभर पक्ष्यांची नोंद केलीच पाहिजे हा त्यांचा पहिला दंडक. ते काम तो करतोय की नाही याची शहानिशा ते जातीनं करत.

पक्षी टिपताना तो नीटच टिपला पाहिजे– हा दुसरा दंडक. नमुना म्हणून जतन करण्यासाठी पक्षी वाटेल तसा मारून चालत नाही म्हणून तो काळजीपूर्वकच टिपायचा.

मनात आलं म्हणून दिसलेला कोणताही पक्षी विनाकारण टिपायचा नाही हा तिसरा दंडक. त्यासाठी आधी पक्षी नीट ओळखायला शिका, संग्रहात नमुन्यादाखल हवा असलेलाच पक्षी फक्त टिपून मारा अशी कठोर तंबी असे.

मारलेल्या पक्ष्यांचं स्किनिंग करण्यात त्यांना स्वारस्य नव्हतं. सुरुवातीच्या सर्वेक्षण मोहिमांत आवश्यक होतं तेव्हा तर त्यांनी ते केलंच, पण ते उत्कृष्टपणे कसं करावं याचं मार्गदर्शन विद्यार्थ्यांना करताना अगदी उतारवयातही स्किनिंगमधलं आपलं कौशल्य दाखवलं.

आपल्या विद्यार्थ्यांवर त्यांची घारीसारखी नजर. ममतेची अन् करडेपणाचीही. ज्या ज्या ठिकाणी त्यांच्या विद्यार्थ्यांचा शोध-प्रकल्प चालू असे तिथे जातीनं जात. त्यांना काही अडचणी, शंका असतील तर त्यांचं निवारण करत. स्वत:चंही शंकासमाधान करून घेत. अगदी शेवटी शेवटी, वयाच्या नव्वदीतही त्यांनी आपल्या विद्यार्थ्यांकडे दुर्लक्ष केलं नाही. पावलांवर सूज आलेली असो, काठी घेऊन चालावं लागणार असो, त्यांना कुचराई माहीतच नव्हती.



डॉ. रॉबर्ट ग्रब हे त्यांचे विद्यार्थी. १९७३ साली ते सालिमसरांच्या मार्गदर्शनानुसार गीरच्या जंगलात परिसंस्था आणि वर्तन या दृष्टिकोनातून गिधाडांच्या जीवनाचा अभ्यास करत होते. त्या जंगलातल्या एका टेकडीच्या दोन हजार फूट उंच माथ्यावर मुक्काम ठोकून, जंगलावर घिरट्या घालणाऱ्या गिधाडांचं निरीक्षण करून नोंदी ठेवत होते.

या विद्यार्थ्याला त्याच्या अभ्यासात काही अडचणी भासतात का, आपल्यालाही काही नवीन समजण्यासारखं आहे का हे जाणून घेण्यासाठी हे गुरुवर्य तिथे गेले.

डॉ. ग्रब आपली आठवण सांगतात – 'हा प्रकल्प हाती घ्यायला सालिम अलींनी मला सुचवलं तेव्हा थोड्याशा नाराजीनंच मी तिथ गलो... पण खरं सांगतो. निरीक्षण करता करता मला गिधाडांविषयी आत्मीयता वाटू लागली... ते मला मोराप्रमाणे प्रिय झाले... ही सारी सरांची देणगी.'

आपला विद्यार्थी सर्वोत्कृष्ट ठरावा म्हणून ते धडपडत, पण त्याच्या पारड्यात आपलं वजन टाकायला ते कधीच पुढे सरसावले नाहीत. १९७७ मध्ये त्यांच्या एका विद्यार्थ्याने – पी. कन्नन यांनी – वाईल्ड लाईफ रिजनल ऑफिसमध्ये नोकरीसाठी अर्ज केला. त्या पदाच्या निवडसमितीवर सालिम अली होते. आपल्या विद्यार्थ्याचे नाव उमेदवारांच्या यादीत आहे असे समजताच त्यांनी निवडसमितीचा राजीनामा दिला. म्हणाले – 'तू त्या पदासाठी लायक आहेस. पण माझ्या विद्यार्थ्याला मीच निवडावं हे योग्य नव्हे.'

पी. कन्नन यांची निवड समितीने नियुक्त केली. आजही ते त्याच संस्थेत उच्च पदावर आहेत.

सोसायटीला पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी अध्यासन मिळाल्यावर पुढच्या तीस वर्षांत सालिम अलींच्या हाताखालून अनेक विद्यार्थी गेले. पर्यावरण, परिसंस्था, वर्तनशास्त्र या पैलूंवर भर देणारे कितीतरी अभ्यास सालिम अलींनी या विद्यार्थ्यांच्या मदतीने पार पाडले. सालिम अलींच्या कार्याची पताका खांद्यावर घेऊन त्यांचे अनेक विद्यार्थी आजही कार्यरत आहेत. नाना प्रकल्प राबवत आहेत.

सालिम अलींच्या विद्यार्थ्यांच्या दृष्टीने ते एक व्यक्ती नव्हते. संस्था होते. प्रेरणादायी संस्था! आपल्या विद्यार्थ्यांच्या यशाचा, कामगिरीचा त्यांना विलक्षण अभिमान वाटे. त्यांच्या हाताखाली एक मोठा विद्यार्थि वर्ग तयार झाला. तरुणांचं लक्ष पक्षिशास्त्राकडे आकर्षून घेण्यात ते यशस्वी ठरले. हुमायून अब्दुलअली, प्रभाकर सोमण, जे.सी. डॅनियल, रॉबर्ट ग्रब, पी. कन्नन, एस.ए. हुसेन, व्ही.एस. विजयन्, विजयकुमार आंबेडकर... हे त्यांचे काही विद्यार्थी. पक्षिशास्त्रातील तज्ज्ञ, निसर्गवेत्ते, कीटक शास्त्रज्ञ. आपापल्या क्षेत्रात लौकिक राखून आहेत.





सालिम अलींच्या कुटुंबीयांतही अनेकांनी त्यांचा मार्ग अनुसरलाय. त्यांच्या भावा-बहिणीच्या मुलांनी सालिम अलींकडून वारसा घेतला. आज त्यांचीही नातवंडे तोच वारसा पुढे चालू ठेवताहेत, वृद्धिंगत करताहेत.

बाकी सालिम अलींच्या विश्वात लहान मुलांना, नातवंडांना खास स्थान. त्यात ती मुलं पक्ष्यांवर, निसर्गावर प्रेम करणारी असली तर सालिम अलींचा उत्साह बघायलाच नको. बाल विद्यार्थ्यांसाठी खास पक्षिनिरीक्षण मोहिमांचं आयोजन असलं की त्यांना ते आपल्याबरोबर वागवत, हिंडवत. पक्षिनिरीक्षणाचे प्राथमिक धडे देत. सारी महत्त्वाची कामं बाजूला ठेवून ते त्या मुलांच्या शंका-निरसनात रमत. मुलांना निसर्गप्रेमाचं बाळकडू पाजण्यात त्यांना नेहमीच उत्साह.

'...शालेय अभ्यासक्रमात निसर्गअभ्यास समाविष्ट केला म्हणजे मग त्याची गोडी लागेलच असं नाही. हा विषय म्हणजे गणित, बीजगणित नव्हे... याची लागण गोवर-कांजिण्यांसारखीच व्हायला हवी...' हा रोग अजून लोकांना हाडीमाशी खिळला नसला तरी त्याचा प्रादुर्भाव होतोय हे तर नक्कीच. त्याचा यथायोग्य फैलाव होण्यासाठी १९४८ सालापासूनच त्यांनी विविध उपक्रम आखले. निसर्गसहली, चर्चासत्रे, फिल्मशोज् आयोजले. पुस्तके लिहिली.

त्यांच्या या साऱ्या धडपडीमागे एक रहस्य होतं – 'I cannot go on being a unique person.' आपल्यासारखे अनेक सालिम अली झाले पाहिजेत, पक्षिगण वाढला पाहिजे हीच इच्छा. हाच प्रयत्न.

निरीक्षणातून अभ्यास, संशोधन करणाऱ्याच्या अंगी विलक्षण चिकाटी, धीर, संयम, एकाग्र वृत्ती असावी लागते आणि एकाग्र वृत्ती, विलक्षण तन्मयता हा तर सालिम अलींचा खास पैलू.

एका वेळी एकच काम. खाताना खावं, वाचताना वाचावं, पाहताना पाहावं आणि अगदी सारथ्य करत असतानाही फक्त सारथ्यच करावं.

एकाग्रतेने, तन्मयतेने काम करणाऱ्या त्यांच्या विद्यार्थ्यांना, सहकाऱ्यांना त्यांचं अभय होतं. पण एकाग्रता ढळवणाऱ्याला त्यांच्या दरबारी क्षमा नव्हती.

पंचवीस-तीस वर्षांपूर्वी सालिम अली हुमायून अब्दुल अलीसमवेत मध्यप्रदेशात पक्षिनिरीक्षणासाठी गेले होते. त्या मोहिमेत एकदा ते दोघंच स्टेशनवॅगनने प्रवास करत होते. सारथ्य करत होते सालिम अली. शेजारी बसले होते हुमायून. त्यांना रस्त्याच्या कडेनं एक विशिष्ट पक्षी उडताना दिसला. त्यांनी उत्साहाने सालिममामूंचं लक्ष या पक्ष्याकडे वेधण्याचा प्रयत्न केला.



झालं!

सालिममामूंनी गाडी तत्काळ थांबवली आणि मग आपल्या भाच्यावर अशी काही आगपाखड केली की ते आता आपल्याला गोळीने उडवतील तर बरं असं भाच्याला वाटलं.

एवढासा सुद्धा विक्षेप सालिम अलींना सहन झाला नव्हता. पक्षिनिरीक्षण कितीही जिव्हाळ्याचे असले तरी गाडीवर सारथ्य करताना ते करायचं नाही. काम करत असताना तर गप्पा मारलेल्या, अनावश्यक बोललेलं त्यांना खपत नसे. एकाग्रता भंग करणाऱ्याला फटकारून गप्प करणं शक्य नसे तेव्हा त्यांचा धारदार विनोद समोरच्याला आडवं करी.

भरतपूरला पक्ष्यांना कडी चढवण्याचं काम चालू होतं. सालिम साहेब नेहमीच्या एकाग्रतेने त्यांच्या कामात गर्क होते. भारताचा थोर पक्षितज्ज्ञ आपल्या परिसरात वावरतोय तेव्हा याची दखल घेऊ या, म्हणून तिथले कुटुंब नियोजन खात्याचे डायरेक्टर आपल्या लवाजम्यासह सालिम अलींच्या भेटीसाठी आले. आल्या आल्या आपलं नाव नि हुद्दा सांगितला. परिचय करून दिला.

कालहरणाचं संकट टाळण्यासाठी सालिम अलींनी आपलं अमोघ शस्त्र उपसलं – 'माफ करा हं... मला वाटतं, या इथं तुमच्या कार्यात आम्हाला काही योगदान करता येण्यासारखं नाही.'

त्यांच्या एकाग्रतेच्या आग्रहाचं आत्यंतिक टोक म्हणजे – शहाण्यानं लग्न करू नये! कोणी विवाहबंधनात गुंतू नये असा त्यांचा सल्ला असे. आपण जसं पूर्णांशाने आपल्या कार्याला वाहून घेतलंय, तसंच आपल्या कार्याचा वारसा चालवणाऱ्यांनाही वाहून घ्यायचं असेल तर त्यांनी अविवाहित राहणं इष्ट असा त्यांचा प्रामाणिक आग्रह बराच काळ टिकून होता. आपल्या सहकाऱ्यांना, विद्यार्थ्यांना ते प्रत्याप्रत्यक्षपणे विवाहापासून परावृत्त करत. प्रसंगी लग्नासाठी अगदी रजा देणंही टाळत.

आजही सोसायटीत कार्यभार सांभाळत असलेले पी.बी. शेखर यांनी आपला विवाह कसा साधून घेतला ती एक मजेशीर कथा आहे.

१९६२ च्या मे महिन्यात आपला हा भिडू विवाहबद्ध होणार आहे याची कुणकूण साहेबमजकुरांस लागताच त्यांनी त्या वर्षी त्याला रजाच मंजूर केली नाही. पुढच्या वर्षी पी.बी. शेखर रजेवर गावी गेले. तिथे आधी आपला विवाह उरकून घेतला आणि मग सालिमसाहेबांना लग्नपत्रिका धाडली. उत्तरादाखल खरमरीत पत्र, पण सोबत पन्नास रुपयांचा चेकही आला.





नंतर नंतर मात्र त्यांचा हा विरोध मावळत गेला. तरीही आपला एखादा भिडू लग्न करतोय असं समजलं की मान झटकून खांदे उडवून म्हणत – 'गेला, गेला, आणखी एक वाया गेला!'

तेहमिनाच्या मृत्यूनंतर सालिम अलींनी पुन्हा घरटं बांधलं नाही हे खरं, पण १९५०-५२ च्या सुमारास त्यांनी नवं घरटं बांधण्याच्या दृष्टीने थोडी जुळवाजुळव केलीही होती. पण ते घरटं उभारलं जाण्यापूर्वीच उस्कटलं गेलं.

तिचं नाव अमृतकला. हिच्याविषयीचा A.K. असा नुसता उल्लेख सालिम अलींच्या आत्मचरित्रात आहे. पण लोक वान थोंनी आपल्या १९५२ सालच्या रोजनिशीत तिच्याविषयी काही नोंदी ठेवल्यात. ही दिल्लीतील वार्ताहर. वयानं पस्तिशीची. तल्लख. बहुश्रुत. एकदा भरतपूरच्या पक्षिनिरीक्षण मोहिमेतही सहभागी झाली होती... नंतरच्या वर्षात सालिम-अमृतकलाच्या गाठीभेटीही झाल्या. कमरुन्निसाला – सालिम अलींच्या बहिणीला – बरं वाटलं. चला, आपला भाऊ पुन्हा एकदा गृहस्थ होईल.

पण तसं व्हायचं नव्हतं.

१९५२ च्या दिवाळीच्या सुमारास लोक वान थो नोंदवतात – 'सालिम आणि मी दिवाळीचे चार दिवस किहिमला घालवणार होतो. पण A.K. दिल्लीहून येत असल्याचं समजलं. दोघंही रेल्वे स्थानकावर जाऊन आलो... ती आली नाही... दुसऱ्या दिवशी सालिम एकटाच रेल्वे स्थानकावर फेरी मारून आला. ती आली नाहीच... सालिमची चलबिचल दिवसभर जाणवत होती...'

सालिम अलींच्या आयुष्यात उशिरानं उठलेला हा तरंग अहितकारक तर ठरणार नाही ना, अशी भीती लोक वान थोंना वाटली. ती भावनाही त्यांनी आपल्या रोजनिशीत व्यक्त करून ठेवली. पण A.K. ला लोक वान थोंच्या या भटक्या पक्षि मित्राबरोबर तीन दगड मांडणं कठीण वाटलं असावं... तो तरंग तिथंच विरला...

हाती घेतलेल्या कार्याच्या आड त्यांनी त्यांचं खाजगी आयुष्य येऊ दिलं नाही की जात, धर्म यांचा अडसर होऊ दिला नाही.

एकूणच धार्मिक आन्हिकांबद्दल त्यांना आस्था नव्हती. पूर्वायुष्यात, अगदी विवाहपूर्व काळात, अमीरुद्दीनमामांच्या घरी असताना काय नमाज पढले असतील तेवढेच आणि तेही मामांची राजी राखण्यासाठी म्हणूनच. एकदा तर अनावृत मस्तकानेच नमाज पढू लागले. ही आगळीक त्यांच्या आत्तेभावाने, अदनान फतेहअलीने, लक्षात आणून दिली. तेव्हा मग इकडे-तिकडे शोधाशोध करून हाताशी लागलेली हॅट डोक्यावर चढवून त्यांनी नमाज पुरा केला.



दिवसातून पाच वेळा नमाज पढणं असो किंवा जैन धर्मीयांचं मुंग्यांना खाऊ घालणं असो त्यांच्या बुद्धिप्रामाण्यात अशा गोष्टींना थारा नव्हता. धर्माच्या नावाखाली चालणाऱ्या ओंगळवाण्या गोष्टींना तर त्यांचा सक्त विरोध होता.

१९७५ साली भारत सरकारने सर्पांच्या आणि सर्पकातडीच्या निर्यातीवर बंदी घातली. परिणामी, १९७६ मध्ये मद्रासच्या गोदीत दहा लाख रुपये किमतीची सर्प कातडी पडून राहिली. सरकारी आदेश निघण्याआधी मारलेल्या सापांची कातडी पाडून ठेवण्यापेक्षा ती निर्यात होऊ द्यावीत आणि त्यावर उपजीविका करणाऱ्याची आर्थिक अडचण दूर करावी अशी रदबदली सालिम अलींनी सरकारकडे करावी अशी अर्जी घेऊन तामिळनाडूचा एक मंत्री त्यांच्याकडे आला. सालिम अलींनी सरकारपुढे या लोकांची बाजू मांडली तर सरकार पूर्वीच जमा झालेली कातडी निर्यातीसाठी मुक्त करण्यास राजी होईल अशी खात्री मंत्री महोदयांना होती. मंत्र्याची ही बाजू सालिम अलींना पटली. पण या प्रसंगी बोलण्याच्या ओघात त्या मंत्र्याने एक घोडचूक केली. त्या लोकांची बाजू मांडताना तो बोलून गेला '...हे लोक आपल्याच (मुस्लिम) धर्माचे आहेत. त्यांचं नुकसान...' वाक्य पूर्ण करण्यापूर्वीच अलींनी त्याला रोखलं. वाक्य पूर्ण करण्याची संधीच न देता त्याला बाहेरचा रस्ता दाखवला.

कोणत्या धर्मीयांसाठी वजन खर्च करायची तयारी नव्हती, तशीच काळ्या-गोऱ्या वर्णाचाही त्यांना गंड नव्हता. त्यांचं अर्धअधिक आयुष्य गेलं होतं ब्रिटिश राजवटीत. त्यांच्या अभ्यासापायी अनेक गौरवर्णी पक्षितज्ज्ञांत वावरण्याची संधी त्यांना मिळाली होती. इंग्रजांच्या शिस्तप्रियतेचं, गुणग्राहकतेचं, वक्तशीरपणाचं कौतुक त्यांना होतं. इंग्रजी भाषा तर त्यांच्या अति जिव्हाळ्याची. पण म्हणून गोऱ्या वर्णाला सर्वगुणसंपन्न समजून गुन्हे माफ करण्याच्या न्यूनगंडाने त्यांना पछाडलं नव्हतं. उलट उर्मट, कडवट ब्रिटिशांबरोबर वागताना त्यांचं भारतीयत्व उजळून निघे. ज्या ब्रिटिश पक्षितज्ज्ञांची भारतीय स्वातंत्र्याविषयी विरोधी मते होती त्यांना तर ते सरळ ऐकवत – 'आपण एकमेकांची मतं बदलवू शकू असे नाही... त्यात वेळ खर्च करण्यापेक्षा पक्षि अभ्यासावर एकमत होऊन आपण काम संपवूया.'

स्वातंत्र्याच्या चळवळींपासून ते अलिप्त होते. मौ. शौकत अली, सरोजिनी नायडू, पं. जवाहरलाल नेहरू अशासारख्यांच्या सहवासात येऊनही ते चळवळीत उतरले नाहीत. त्यांच्या मोठ्या भावाची पत्नी, मामा अब्बास तय्यबजी, भाऊ जाबिर वगैरे नातेवाईक प्रत्यक्ष स्वातंत्र्य चळवळीत होते. कैदेत होते. पण सालिम अली त्यापासून अलग होते. आपल्या कार्यक्षेत्राबाहेर गेले नाहीत. मात्र १५ ऑगस्ट रोजी पहिल्या





स्वातंत्र्यदिनी त्यांनी स्वहस्ते सोसायटीवर तिरंगा फडकवला.

महात्मा गांधींच्या वधाविषयी त्यांच्या मनात कोणते विचार उठले याची साक्ष त्यांनी स्नेह्याला, रेन्शला, पाठवलेल्या (१२.७.१९४८) पत्रात मिळते. – '...एका भारतीयानेच म. गांधींचा वध केलाय या शरमेतून मान वर होत नाही. जातीय द्वेषाच्या या वातावरणात तोच काय तो एक आशेचा किरण होता... गेल्या दोन जागतिक महायुद्धांमुळे एक गोष्ट सिद्ध झालीय – माणूस स्वत:ची हाव नि स्वार्थ कधीच सोडणार नाही. तो स्वत:च्या अनुभवातून कधीच शहाणा होणार नाही...'

स्वातंत्र्योत्तर काळात त्यांच्या खांद्यावर सोसायटीची जबाबदारी पडली. ती पेलत असतानाही अनेक काळ्या-गोऱ्यांशी त्यांचा संबंध आला, पण त्यांची वागणूक सर्वांशी समानतेचीच होती. त्यांची कोणाशी स्पर्धा नव्हती. कसलं वैफल्य त्यांच्या पदरी नव्हतं. तत्त्वाला मुरड घालून कोणाला खूश राखण्याची भीड त्यांना कधीच पडली नाही.

१९४३-४४ च्या सुमारास सालिम अली भूज प्रदेशात पक्षि-सर्वेक्षण करत होते. त्या वेळी महाराव विजय रावजी गोऱ्या साहेबाला नि आपल्याला भिन्न वागणूक देताहेत हे लक्षात येताक्षणी त्यांनी संस्थान दरबारी निषेध नोंदवला. पुन्हा म्हणून राजवाड्याच्या प्रवेशद्वारी गेले नाहीत. हेच सालिम अली एखाद्या वनरक्षकाच्या विनंतीला, त्यांच्या समवेत फोटो काढण्याच्या इच्छेला तात्काळ मान्यता देऊन फोटोसाठी उभे राहत.

प्रसिद्धीच्या झोतात राहण्यासाठी, प्रसारमाध्यमांतून झळकण्यासाठी त्यांची कधीच धडपड नसे. कोणी एखाद्या समारंभाच्या अध्यक्षपदासाठी त्यांचं नाव सुचवलं तर त्याला मान्यता देण्यापूर्वी चौकशी करून, स्वत:ची खात्री करून मगच होकार देत. मग ते अध्यक्षपद 'बॉम्बे इन्विरनमेंट ॲक्शन ग्रूप' चं असो की इंग्रजी पत्रकारितेतील डेरिल डिमाँटींच्या पुस्तक प्रकाशन समारंभाचं असो.

आपल्या 'टेंपल्स ऑर टोंब' या पुस्तकाच्या प्रकाशन समारंभाचे अध्यक्षपद त्यांनी स्वीकारावे अशी विनंती डेरिल डिमाँटींनी केली. ते राजी झाले, पण एका अटीवर. आधी डिमाँटींनी त्यांच्या पुस्तकातीलच एक दोन प्रकरणं वाचून दाखवावीत. तशी ती डिमाँटींनी वाचून दाखवली. मगच सालिम अलींनी समारंभाचं अध्यक्षपद भूषवलं.

सालिम अलींच्या आयुष्यात त्यांना त्यांच्या कार्याचा, अभ्यासाचा, ज्ञानाचा, चळवळीचा गौरव झालेला पाहायला मिळाला. अनेक पुरस्कार, पदव्या, मानसन्मान त्यांना लाभले. जागतिक पातळीवर त्यांच्या अभ्यासाची दखल घेतली गेली. एका बिगर ब्रिटिश पक्षितज्ज्ञाला, सालिम अलींना १९६७ साली प्रथम 'ब्रिटिश ऑर्निथॉलॉजिकल युनियन' तर्फे सुवर्णपदक मिळालं. या निमित्ताने गौरव करताना ब्रि.ऑ. युनियनच्या 'आयबिस्' नियतकालिकानं म्हटलंय – '...१९३७ साली आयबिसने भारतीय पक्षिविज्ञानाबाबत



चिंता व्यक्त केली होती. ती सालिम अलींच्या पुस्तकांनी अनाठायी ठरवलीय...'

भारत सरकारने प्रदान केलेले पद्मभूषण, पद्मविभूषण हे किताब त्यांच्या मस्तकावरील मानाचे तुरे आहेत. १९७६ साली त्यांना पक्षिविज्ञानासाठी अमेरिकेचे नोबेल पारितोषिकाच्या तोडीचे 'जे पॉल गेट्टी वाइल्ड लाईफ कॉन्झर्वेशन प्राईझ' मिळाले. 'भारतात निसर्गसंरक्षणासाठी योग्य मनोभूमिका आणि परिस्थिती तयार करण्यासाठी त्यांनी सतत पन्नास वर्षे परिश्रम घेतले' या कार्याचा गौरव करण्यासाठी हा पन्नास हजार डॉलर्सचा पुरस्कार त्यांना बहाल करण्यात आला.

१९८६ साली त्यांना नेदरलंडचा 'कमांडर इन ऑर्डर ऑफ गोल्डन आर्क' हा किताब लाभला. हा किताब प्रदान करण्याचा समारंभ मुंबईच्या ताज हॉटेलात पार पडला. या समारंभाचं वैशिष्ट्य म्हणजे उपस्थितांना 'वॅडन सी बर्ड पॅरडाईज' ही फिल्म दाखवण्यात आली. ती पाहताना वृद्ध सालिम अलींना विशेष आनंद झाला. पस्तीस वर्षांपूर्वी नेदरलंडमधील हे स्थान पक्षि अभयारण्य म्हणून घोषित व्हावं यासाठी त्या शासनाला सालिम अलींसह अनेक पक्षितज्ज्ञांच्या सह्यांचं विनंतिपत्र गेलं होतं. ते अभयारण्य पडद्यावर पाहताना ते सुखावले.

ह्या प्रसंगी भाषण करताना ते म्हणाले – '...या वयात पुरस्कार मिळाला काय न मिळाला काय, काय फरक पडतो! यापेक्षा आता तरुणांना प्रोत्साहन मिळण्याच्या दृष्टीने प्रयत्न व्हावेत हे बरं...'

राष्ट्रीय स्तरावरचे, जागतिक कीर्तीचे मानसन्मान लाभले असले तरी त्यांना कोणी जगप्रसिद्ध, जगद्विख्यात म्हणून संबोधलेलं आवडत नसे. 'मी लोकांना माहीत झालोय एवढंच. असे कितीतरी सालिम अली आहेत' असं ते विनयाने म्हणत.

त्यांना कृत्रिम वागण्याचा, खोट्या स्तुतीचा तिटकारा होता. विशेषत: त्यांच्या कार्याची, क्षेत्राची जाणकारी नसलेली व्यक्ती त्यांची स्तुती करू लागली की ते अधिकच कंटाळत.

सालिम अलींचा अभ्यास, त्यांचे कार्य तज्ज्ञ वर्तुळापलीकडे सामान्य लोकांपर्यंत पोहोचायला बराच काळ जावा लागला. मात्र त्यांनी सुरू केलेली निसर्ग संरक्षणाची चळवळ जनमानसात रुजू लागल्याची, मूळ धरू लागल्याची चिन्हं त्यांना त्यांच्या उत्तर आयुष्यात पाहायला मिळाली. सुरुवातीच्या काळात अस्फुट नि एकाकी वाटणारा त्यांचा आवाज सतत पन्नाससाठ वर्षांच्या परिश्रमानंतर बुलंद, बलाढ्य होत चालल्याची अनुभूती त्यांना 'सायलेंट व्हॅली' च्या निमित्ताने मिळाली. विलक्षण कृतकृत्यता वाटावी असाच तो अनुभव.





सालिम नावातच सगळी गुणवैशिष्ट्यं आहेत. सालिम म्हणजे संपूर्ण, अभंग, निरोगी, जशाचा तसा... सालिम अलींच्या प्रदीर्घायुष्याचा पट पाहिला तर त्यांच्या नावातली सार्थकताच जाणवते. अचूक, आखीवरेखीव, निग्रही, अभंग. सालिम अली निरोगीही होते. वक्तशीर, निर्व्यसनी सालिम मिताहारी होते. त्यांची तब्येत नेहमीच शंभर टक्के खणखणीत. त्यात मैलोन्‌मैलांची चाल. त्यामुळे अंगकाठीही चिवट, काटक. आजारपण जवळपासही फिरकत नसे. कोणी आजारी पडतोच कसा याचं त्यांना कोडं पडे. कोणी आजारी पडलेलं त्यांना सहनही होत नसे. विशेषत: पक्षि-मोहिमेवर असताना. अशा वेळी कोणी आजारी पडण्याची आगळीक केली की त्याची तातडीने स्वगृही पाठवणी व्हायची.

अगदी अलीकडे म्हणजे वयाच्या ब्याऐंशीव्या वर्षी ते सहा जणांच्या चमूसह अंदमान-निकोबार बेटांवर पक्षिनिरीक्षणासाठी गेले होते. त्या सहांपैकी चौघं मलेरियानं आडवे झाले. त्या चौघांनाही सालिम अलींनी तातडीने मुंबईला रवाना केलं नि उरलेल्या दोघांसह आपली मोहीम पार पाडली.

याही वयात पाठीवर नेहमीची हॅवरसॅक टाकून सिंहगडावर पक्षिनिरीक्षणासाठी जाण्याची त्यांची तयारी असे. साधारणत: साठी उलटली की भारतीय माणूस प्रवासाला नाखूष असतो. पण नव्वदीतही सालिमसाहेब पक्षियात्रेसाठी उत्सुक असत. तयार असत. तरुणांनाही मागे सारणारा तो उत्साह. उभ्या उंटावर स्वार होण्यासाठी इतरेजन शिडीची शोधाशोध करत असत तेव्हा वयाने त्यांच्यापेक्षा दुपटीने असलेले हे आजोबा शरीराला एक झटका देऊन उंटावर चढून स्वार झालेले असत.

पाच-पाच किलोमीटर्स पायी चालत जाऊन आजूबाजूची एखादी पुरातन गुहा पाहायला निघतानाही ते सर्वांच्या पुढे असत. कंटाळा, थकवा, आळस या शब्दांना त्यांच्या जीवनक्रमात थारा नव्हता.

त्याही वयात त्यांच्या चालण्याचा झपाटा उणावलेला नव्हता. बरोबर चालणाऱ्यांना त्यांच्या चालीशी जुळवून घेताना धावपळ करावी लागे.

पक्षिनिरीक्षणातली संथ गती त्यांच्या चालण्याला मानवत नव्हती तशी त्यांच्या मोटरसायकललाही कधी मानवली नाही. पक्ष्यांपाठी मैलोन्‌मैल पायी भ्रमंती करत, पण मानवी सृष्टीत वावरताना मात्र त्यांना वेग हवा असे. त्यांची लाडकी 'सनबिम' मोटरसायकल हे एक आयुष्यातलं खास प्रकरण. ते एकदा तिच्यावर आरूढ झाले की भन्नाट वेगाने मुंबईचे गर्दीचे रस्तेही लीलया पार करत. पक्ष्यांप्रमाणे उडता येत नसल्याची कसर भरून काढत. वयाच्या सत्तरीत आल्यावर डॉक्टरांनी बंदी घातली. त्यानंतरच ती सवारी थांबली. १९५० साली याच मोटरसायकलवरून त्यांनी यूरपचा प्रवास केला. एकदोन जिवावरचे प्रसंगही अनुभवले. या साहसयात्रेचं वर्णन



त्यांनी आत्मचरित्रात समरसतेनं केलंय.

वार्धक्यात मोटरसायकलस्वारीवर बंदी आली तरी त्या प्रेमाला ओहोटी लागली नव्हती. १९८० साली ते श्रीलंकेला गेले. तिथं मोटरसायकलींचं एक प्रदर्शन चालू होतं. वेळात वेळ काढून ते तिथं गेले. अर्धाएक तास तिथं घालवला. नवीन मॉडेल्स अभ्यासली. बांधणीतले बदल नि बारकावे समजून घेतले... आपलं ज्ञान अद्ययावत् करून घेतलं.

त्यांच्या खणखणीत प्रकृतीचं, आरोग्यसंपन्न दीर्घायुष्याचं कुतूहल सर्वांनाच असे. जो तो आपापल्या परीनं रहस्य जाणून घेण्याचा प्रयत्न करी. मग ते त्यावर काही तरी गमतीशीर उत्तर देत.

एकदा असंच झालं. भरतपूरला 'पक्ष्यांचे स्थलांतरण' विषयक आंतरराष्ट्रीय सेमिनार चालू होता. देशोदेशीचे प्रतिनिधी उपस्थित होते. रात्री भोजनप्रसंगी वृद्ध सालिम अली थाळीत थोडासा चनाभतुरा घेऊन एका बाजूला बसून खात होते. वार्धक्यात त्यांचा मिताहार आणखीनच संकोचला होता. त्यात ते रात्रीचे अगदीच कमी खात. पण चनाभतुरा आवडीचा. म्हणून जरा चव घेत होते.

एका परदेशी मित्राने त्यांना हेरलं. त्यांची मस्करी करण्यासाठी म्हणाला – 'कळलं. तुमच्या दीर्घायुष्याचं रहस्य कळलं. चना भतुरा!' 'पण आयुष्यभर फक्त तोच खाल्ला तर नाही बरं का!' सालिम अलींनी वार परतवला.

आपल्या दीर्घायुष्याचं रहस्य सांगताना ते म्हणत, 'ज्याला नव्वदावं वर्ष पाहायचंय त्याने पक्षिनिरीक्षण करावं.'

नव्वदावं वर्ष हे एखाद्याच्या दृष्टीनं अनंत ठरू शकतं पण या वयातही निवृत्तीचा विचार त्यांना स्पर्शही करू शकला नाही. 'मी जोवर कार्यरत आहे. तोवर नव्वदी काय नि शंभरी काय... मला त्याची काळजी नाही... पुराणवस्तू होऊन जगण्यात मात्र अर्थ नाही...'

त्यांच्या वृत्तींना, मनाला मरगळ कशी ती नव्हतीच. म्हणूनच तर नव्वदाव्या वाढदिवशी त्यांचे अभीष्टचिंतन करण्यासाठी येणाऱ्यांचे स्वागत करायला ते दाढीला व्यवस्थित आकार वगैरे देऊन, टापटिपीने कपडे करून वेळेवर तयार होते.

अनेकांनी त्यांना भेटकार्ड, भेटवस्तू, पुष्पगुच्छ दिले. ते सारं पाहून गमतीने डोळे मिचकावत, खांदे उडवत उद्गारले – 'बाकी लग्नापरीस हे बरं!'

त्यांच्या वार्धक्याला असमर्थतेच्या भावनेचा स्पर्श नव्हता. कामाचा व्याप नि वेग दोन्ही अफाट. इतरांच्या कामाचा वेग कमी वाटला की ते म्हणत, 'मला आणखीन





पंचवीस वर्षं जगायला मिळालं तर कितीतरी कामं उरकू शकेन.'

वार्धक्याचा, सरत आलेल्या आयुष्याचा विचार करत बसत निष्क्रिय निवृत्तीचा तवंग आपल्या आयुष्यावर चढू द्यायची त्यांची तयारी नव्हती. अतिवृद्धावस्थेतही पुढच्या दोन-चार वर्षांत पार पाडायच्या योजनांचे मनसुबे नि आराखडे त्यांच्यापाशी तयार होते.

त्यांच्या कामाचा झपाटा पाहून, त्यांची नित्याची उल्हसित, उत्साही वृत्ती पाहून त्यांच्या सहवासात वावरणारी व्यक्तीही चकित व्हायची. एखादा मुलाखतकार कुतूहलाने त्यांना विचारायचा – 'सभोवताली वातावरण उबवणारं आहे. पूर, दुष्काळ, राजकीय अस्थैर्य... अशा परिस्थितीत तुम्ही प्रफुल्लित मनाने कार्यरत कसे राहू शकता?'

'एक तर मी आशावादी. त्यामुळे सतत प्रयत्नशील असतो... आणि माझ्या हसण्याविषयी म्हणाल तर मला नीट ऐकू येत नाही. त्याचा मी फायदा घेत असतो! संभाषण कंटाळवाणं, त्रासदायक होतंय असं वाटलं की माझं श्रवणयंत्रच बंद करतो!'

शिस्तीचे, वक्तशीरपणाचे, अचूकतेचे, परिपूर्णतेच्या ध्यासाचे कंगोरे त्यांच्या स्वभावाला होते, पण तितकाच, त्याहूनही वरचढ ठरणारा एक स्वभावविशेष होता, सौहार्दता.

आपल्या नर्मविनोदी वाणीमुळे, सौहार्दपूर्ण वर्तनामुळे ते त्यांच्या मित्रपरिवारात, नातेवाइकांत, विद्यार्थिवर्गात, सहकाऱ्यांत प्रिय होते. विनोदाचा अखंड झरा त्यांच्याभोवती कायम झुळझुळ वाहत असायचा. त्यांचं हास्य पसरत दरवळत जायचं.

ते कोणाचे सालिमभाई होते, कोणाचे सलूचाचा होते तर कोणाचे मामू होते, सहकाऱ्यांचे 'ओल्डमॅन' होते तर कर्मचारी वर्गात 'म्हातारबा' होते.

मोठ्या भगिनी फरहात नि कमरुन्निसा यांना दीर्घायुष्य लाभलं. या दोघींनी सालिम अलींना भगिनीप्रेमाइतकंच मातृप्रेमही दिलं. अगदी वार्धक्यातही रुपेरी केसांची ही भावंडं बंगल्याच्या हिरवळीवर संध्याकाळी गप्पागोष्टी करत बसत तेव्हा ते दृश्य कमालीचं विलोभनीय असे.

मात्र शारीरिक दुर्बलतेचा, वैयक्तिक सुखदु:खाचा जाहीर आविष्कार त्यांना कधीच मान्य नव्हता. स्वत:च्या भावभावनांचं प्रदर्शन त्यांनी कधीच केले नाही. त्यांची प्रिय भगिनी, जिने सलग पस्तीस-चाळीस वर्षं त्यांची घरगृहस्थी सांभाळली, तेहमिनानंतर त्यांची देखभाल केली ती कमरुन्निसा १९७६ सालात वारली. तिच्या मृत्यूसमयी ते भूतानच्या पक्षिमोहिमेवर होते. तिथे त्यांना ही दु:खद वार्ता समजली. त्या दिवशी दिवसभर त्यांनी स्वत:ला खोलीत बंद करून घेतलं. मला जेवायलाही बोलवू नका म्हणाले.

दुसऱ्या दिवशी नेहमीप्रमाणे कामाला लागले.



स्वत:च्या मृत्यूचा विचार त्यांना कधी अस्वस्थ करत नसावा. मृत्यूचे वेध लागतात त्या वयातही कधी त्यांना मृत्यूनंतर काय वगैरे विषय आकर्षून घेत नव्हते. त्याविषयीच्या वाचनाबद्दल विषय निघाला, चर्चा होऊ लागली की ते खांदे उडवून म्हणत – 'कशाला त्या वाचनात वेळ घालवा! ... पक्ष्यांसंबंधीची बरीच कामं उरकायचीत!'

असं असलं तरी आपली कबर डेहराडूनला तेहमिनाच्या कबरीशेजारी असावी असा विचार ऐंशी ओलांडण्याच्या सुमारास त्यांनी व्यक्त केला होता. त्या काळात त्यांनी डेहराडूनमध्ये तेहमिनाच्या कबरीचा शोध घेण्याचा प्रयत्नही केला होता. पण मधल्या चाळीस वर्षांत ते स्थान कुठल्याकुठं हरवून गेलं होतं. मग त्यांनी तो विचार बाजूला टाकला.

तसंच एकदा आपलं दफन करण्यापेक्षा दहन करावं असा विचारही त्यांनी आपल्या वडील बहिणीकडे – फरहातकडे – व्यक्त केला हाता. पण तिने त्यावर आक्षेप घेतला. तेव्हा – 'ठीक आहे. मेल्यावर मला त्याचं काय?... हवं ते करा,' म्हणून आपल्यापुरता तो विषय संपवला.

मृत्यूविषयी ते फारसे गंभीर नव्हते. किंबहुना त्याकडे खिलाडू वृत्तीनेच पाहत असावेत. १९८० सालातला त्यांचा एक फोटो आहे– गळफासाचा दोरखंड मानेभोवती ठेवून त्यांनी फोटोसाठी पोज दिलीय. हा फोटो आहे अंदमानातील फाशी देण्याच्या स्थानावरचा. तिथल्या पक्षि-सर्वेक्षण मोहिमेत याही स्थळाचं दर्शन त्यांनी घेतलं होतं.

मृत्यूविषयी विचार करायला त्यांना फुरसत नव्हती. तो यायचा तेव्हा येईल. तोवर आपलं काम करत राहायचं. तो आला की जायचं – एवढा साधा सरळ विचार. त्यामुळे त्यांच्या आयुष्यातला प्रत्येक दिवस हा कालच्या पुढचं एक नवं पाऊल होता. साचलेपण टाळणाऱ्या प्रवाही जीवनाचा नि विचारांचा दस्तावेज होता.







# इति

वयाची पंचाऐंशी वर्षं ठणठणीतपणे काढल्यावर १९८१ साली त्यांना प्रोस्ट्रेट ग्लँड्सच्या शस्त्रक्रियेला सामोरं जावं लागलं. कर्करोगाने त्यांच्या शरीरात प्रवेश केला होता. एका हाती सारा कारभार पाहणाऱ्या सालिम अलींच्या सेवेत आता एखादा दक्ष निजी सचिव असणं जरुरीचं झालं. त्यांची देखभाल करणारी, पत्रव्यवहार सांभाळणारी, दक्षतेने त्यांच्या कारभारात मदत करणारी व्यक्ती त्यांच्या हाताशी असणं आवश्यक होतं. ही गरज लक्षात घेऊन पर्यावरण खात्याने त्यांच्याकरता निजी सचिवाची जाहिरात दिली.

बडोद्याच्या अर्चना मेहरोत्रा या विज्ञानशास्त्राच्या पदवीधर तरुणीची या पदासाठी निवड झाली. १९८२ साली प्रथमच सालिम अलींनी आपल्या कामासाठी मदतनीस घेतला.

एवढ्यात, गेली चाळीस-बेचाळीस वर्षं ते ज्या वास्तूत राहत आले होते ती वास्तू सोडण्याची पाळी त्यांच्यावर आली. कमरुन्निसा नि तिचे पती हसन अली यांच्या पश्चात



त्यांच्या वारसांनी तो बंगला विकला. त्यामुळे १९८३ साली सालिम अली अर्चना मेहरोत्रासह किहिमला आले. कमरुन्निसाचा किहिममधला जुना कौलारू बंगला 'मुराद मंझिल' त्यांना वास्तव्यासाठी मिळाला.

किहिमला ते वास्तव्यासाठी गेले तरी औषधोपचारासाठी त्यांना वरचेवर मुंबईच्या जसलोक रुग्णालयात यावं लागे. या प्रवासाचा त्यांना त्रास व्हायचा, पण न कुरकुरता ते तो झेपवायचे. १९८३ साली बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटीची शताब्दी साजरी झाली. ती धावपळही त्यांनी उत्साहाने केली. शरीराने ते किहिममध्ये असले तरी मनाने ते सोसायटीच्या हॉर्नबिल हाऊसमध्येच असत.

पक्षिविज्ञान अभ्याससंस्था उभारण्याचा ध्यास त्यांची पाठ सोडायला तयार नव्हता. पंतप्रधान राजीव गांधी यांचे सचिव श्री. शेषन त्यांना किहिमला येऊन भेटून गेले. या संस्थेच्या उभारणीसाठी केंद्र सरकार काय मदत करील, कोणत्या अटीवर करील यावर चर्चाही झाली.

सरकारचं म्हणणं होतं, त्यांचा एक प्रतिनिधी संस्थेच्या कार्यकारी मंडळावर घेण्याच्या अटीवर सरकार संस्थेला उभारणीसाठी चार कोटी रुपये देईल. सालिम अलींची या प्रस्तावाला हरकत नव्हती. मात्र सोसायटीचे इतर सभासद तयार नव्हते. सरकारचा प्रतिनिधी कार्यकारी मंडळावर आला तर संस्थेची स्वायत्तता जाईल अशी भीती त्यांना होती.

ही भीती निरर्थक आहे हे पटवून देण्यासाठी, सहकाऱ्यांचे मन वळवण्यासाठी सालिम अली प्रयत्नशील होते. आपल्या डोळ्यांदेखत या संशोधन केंद्राची मुहूर्तमेढ उभारली जावी म्हणून धडपडत होते. पण विचारांना आता शरीर साथ देत नव्हतं...

कर्करोगानं त्यांचं शरीर ताब्यात घ्यायला सुरुवात केली... त्यांच्या पायावर सूज येऊ लागली... जसलोकच्या फेऱ्या चालू होत्याच... मेंदू मात्र पूर्वीइतकाच तरतरीत... विचारांवर कसलं सावट म्हणून नाही. एकदा जसलोक रुग्णालयातून परतत असताना रस्त्यात एके ठिकाणी त्यांना जखमी घुबड आढळलं. ते त्यांनी किहिमला आणलं. त्या रात्री भोवतीच्या ग्रामस्थांना जमवून घुबडावर सविस्तर बौद्धिक घेतलं. अलीकडे त्यांचा हा नवा उद्योगच होऊन बसला होता. जवळपासच्या ग्रामस्थांना, शेतकऱ्यांना जमवून त्यांना स्लाईडशोज दाखवणं, त्यांचं प्रबोधन करणं सुरू केलं होतं.

किहिम-मुंबई फेऱ्यांची त्यांची यातायात लक्षात आल्यावर ॲडमिरल आवटींनी त्यांची यॉट क्लबवर सोय केली. पावसाळ्यात या फेऱ्या करणं त्यांना तापदायक ठरलं असतं म्हणून मुंबईत राहणंच सोयीचं असल्याने सालिम अलींनी ॲ. आवटींच्या योजनेस मान्यता दिली.

यॉट क्लबवर मुक्कामास आल्यावर त्यांनी आत्मचरित्राचं लिखाण हाती घेतलं.





हाताशी अर्चना मेहरोत्रा होती. गेली चाळीस वर्षं त्यांच्या सहवासात असणारे आणि तीव्र स्मरणशक्तीचे वरदान लाभलेले श्री. सेराव होते. स्वत: सालिम अलींचीही स्मरणशक्ती दांडगीच. इथल्या वास्तव्यात सालिम अलींनी आत्मचरित्राचं लेखन पूर्ण केलं.

यॉट क्लबवर राहायला आल्याने त्यांना आता सोसायटी अगदी हाकेच्या अंतरावर आली. त्यामुळे सहकारी हाताशी आले. तसंच, औषधोपचार घेणं सुलभ झालं. या सोयी साधल्या हे खरं पण तिथलं वास्तव्य सालिम अलींना मानवेना. त्यांनी पुन्हा किहिमलाच परतायचा निर्णय घेतला.

मात्र किहिमला परतण्यापूर्वी 'मुराद मंझिल'मध्ये काही दुरुस्ती होणं भाग होतं. त्यांनी ती जबाबदारी वास्तुशिल्पी श्री. उल्हास राणे यांच्यावर सोपवली. श्री. उल्हास राणे निसर्गप्रेमी, निसर्गअभ्यासक. सालिम अलींना गुरुस्थानी मानणारे. त्यांनी घरदुरुस्तीची जबाबदारी घेतली.

काम कुठवर आलंय हे पहायला दस्तुरखुद्द सालिम अली मधून मधून राणेंच्या बरोबर किहिमला जात. घारीच्या नजरेनं कामाची तपासणी करत. कुठे खिडकीची कडी रंगवायची राहून गेलेली आढळे तर कुठे दार कुरकुरताना जाणवे. 'पूर्वीसारखे आताशी कारागीर काम करत नाहीत' ही त्यांची नेहमीची तक्रार.

राणे देवगडचे. देवगडचा हापूस आंबा जगप्रसिद्ध. राणेंना सालिम अलींनी बजावलं – 'देवगडहून हापूस आंब्याची कलमं आणून बंगल्याभोवती लाव. पाच-सहा वर्षांत फळ लागेल. मग दाबून पार्टी करू.' वयाच्या नव्वदीत शिरल्यावरही आंब्याची कलमं लावून फळांची वाट बघायची तयारी.

मुराद मंझिलची दुरुस्ती झाल्यावर यॉट क्लब सोडला. ते किहिमला परतले.

किहिमला आल्यावर सर्व देखभाल करायला अर्चना मेहरोत्रा होतीच. ती त्यांची सारी गृहस्थी पाही. तिने भाज्यांचे, धान्यांचे वर्तमान भाव सांगितले की सालिम अली भूतकाळात जात. त्यांना आण्या-पैतले भाव आठवायचे. 'महागाई काय प्रचंड वाढलीय' याची कल्पना यायची. मधल्या पंचेचाळीस वर्षांत कमरुन्निसाने त्यांच्यापर्यंत कसलीच झळ पोचू दिली नव्हती. त्यामुळे बाजारभावाच्या चढ-उताराबाबत ते अनभिज्ञच होते. ते नेहमी म्हणत – 'कमू अन् हसनमुळे मला गृहस्थीचा पसारा मांडावा लागला नाही. सारा भार त्यांनीच वाहिला. म्हणून तर मी माझा पूर्ण वेळ पक्षि-अभ्यासाला देऊ शकलो. पक्षिविज्ञानात थोडीफार भर टाकून मी त्यांच्या ऋणातून मुक्त व्हायचा प्रयत्न केलाय.'

१९८५ च्या सप्टेंबर महिन्यात आपल्या नुकत्याच प्रकाशित झालेल्या 'द फॉल ऑफ अ स्पॅरो'च्या प्रतींवर स्वाक्षरी करण्यासाठी ते 'बुक पॉईंट' या पुस्तक विक्रेत्या



कार्यालयात बसले होते. स्वाक्षरी करण्याचे काम चालू होते. त्या वेळी त्यांना बातमी मिळाली – त्यांची राज्यसभेवर नेमणूक झालीय. या वृत्ताचं उपस्थितांनी जोरदार स्वागत केलं. पण सालिम अली विनयानं उत्तरले – 'मी राज्यसभेत कोणत्या पक्षाचा म्हणून जात नाही. पक्ष्यांची बाजू मांडायला जातोय.'

एका झेपेत दोन दोन पायऱ्या ओलांडत जिना चढून जाणारं तारुण्य दहा वर्षांपूर्वी ओसरलं. त्या काळात त्यांना हा सन्मान लाभता तर त्यांच्या चळवळीला अधिक जोम येता. आता नव्वदीत त्यांची श्रवणशक्ती क्षीण झालेली... कर्करोगाचा शिरकाव माकडहाडापर्यंत झालेला... पायावर सूज आता कायमची... हातात काठीही आली होती... उंचावर गेल्यावर धाप लागू लागली. आणि आता ही नेमणूक होत होती!

आताशी त्यांना पूर्वीप्रमाणे धावपळ होत नव्हती. त्यांचा दिवसभरातला बराचसा वेळ मुराद मंझिलच्या व्हरांड्यात आरामखुर्चीत बसून वाचन करण्यात नाहीतर सोसायटीतून भेटायला, सल्ला मागायला येणाऱ्या सहकाऱ्यांशी वार्तालाप करण्यात जायचा. 'फिल्ड गाईड'चं लेखन नुकतंच हातावेगळं केलं होतं. त्यावरही चर्चा व्हायची.

शरीर थकत चाललं होतं तरी विचारशक्ती चिरतरुणच होती. त्यांच्या नव्वदीच्या वाढदिवसानिमित्त झालेल्या सेमिनारमध्ये त्यांनी उपस्थित केलेले प्रश्न, वर्तवलेले अंदाज यांचा आवाका पाहून उपस्थितांना त्यांच्या निसर्ग अभ्यासाच्या अद्ययावततेची प्रचिती आली.








त्यांना एका मुलाखतकारानं विचारलं – 'आजवर जे काही करत आलात तेच नव्यानं पुन्हा करायला सांगितलंत तर कराल का?'

'जे मनात आहे ते पूर्ण करून घेण्याची संधी लाभणं दुर्लभच!... ऐहिक लाभाची शक्यता नसतानाही काही अर्थपूर्ण कामगिरी पार पाडल्याने जे निष्पन्न होतं ते मोलाचं... मला निसर्गाचं, पक्ष्यांचं वेड... अल्पांशाने का होईना मी या शास्त्रात भर टाकू शकलो. मी कृतार्थ आहे. मी काय लिहिलं किंवा जमवलं यापेक्षाही मला जे करायचं होतं ते करायला मिळालं, मला हे फार महत्त्वाचं वाटतं.'

पंचेचाळीस-पन्नास वर्षांपूर्वीची विचारधारा आजही कायम होती. लोक वान थोंनी तो विचार आपल्या रोजनिशीत टिपलाय – 'सुखाच्या शोधात धावणाऱ्या माणसाची अवस्था शेकोटीसमोर बसून ऊब घेणाऱ्या माणसासारखी असते. पुढा शेकावा तर पाठ गारठते. पाठीला उब द्यावी तर पुढा गारठतो. आपल्या आवडीच्या क्षेत्रात काम करायला मिळाल्यानं होणाऱ्या फलनिष्पत्तीचा आनंद हा जीवनाला उभारी देणारा असतो. फिरायला जाणाऱ्या माणसाला चालण्याच्या प्रक्रियेत सर्वांगाला आपापत: ऊब मिळते. तसाच हाही आनंद सहज नि सुखद असतो.'

गेल्या साठसत्तर वर्षांच्या अविरत चालीनं त्यांना ऊब तर दिलीच पण जीवनरसही पुरवला. ते तृप्त होते... समाधानी होते.

गेली चार-साडेचार वर्षं अर्चना मेहरोत्रा त्यांची देखभाल करत आली होती. तिच्या अवतीभोवती असण्यानं त्यांचं वार्धक्य त्यांना सुसह्य झालं होतं. रोज रात्री भोजनापूर्वी दोन तास ती त्यांना वाचून दाखवे... रात्री झोपण्यापूर्वी ते तिच्या मस्तकावर हात ठेवून तिला आशीर्वाद देत... तिचा त्यांना लळा लागला होता... सालिम अलींमधल्या पक्ष्याला घरट्याचीही ऊब जाणवली होती...

पण अर्चना आता सोडून चालली होती... सालिमसरांच्या हाताखाली आपल्याला पदव्युत्तर अभ्यासक्रम पार पाडायला मिळावा ही तिची इच्छा फलद्रूप होण्याची चिन्हं तिला दिसेनात. '...खरं तर त्यांना मला प्रोत्साहनच द्यायचं होतं. पण मग त्यांना माझा वेळ कमी मिळाला असता... मला (पदव्युत्तर अभ्यासाकडे) जाऊ देण्यास ते अभावितपणे विरोध करत होते. ते काय करत होते हे त्यांचं त्यांनाच कळत नसावं. पुढच्या अभ्यासापासून त्यांनी मला परावृत्त केलं. सालिमसरांनी त्यांच्या उभ्या हयातीत असं कृत्य प्रथमच केलं असेल...'

अर्चना मेहरोत्रा गेली. तिचं जाणं त्यांना मनोमन जाणवलं. जिवाला लागलं.

मार्च १९८७ मध्ये दिल्लीला सोसायटीतर्फे एक परिषद भरवली जाणार होती. सोसायटीतील निवडक सहकाऱ्यांसह सालिम अली १३ मार्च रोजी दिल्लीत दाखल झाले. दुसऱ्या दिवशी १४ मार्चला परिषदेचं उद्घाटन पंतप्रधान राजीव गांधी यांच्या



हस्ते व्हायचे होतं.

१३ मार्चला संध्याकाळी सालिम अलींना एकाएकी अस्वस्थ वाटू लागलं. त्यांना लागलीच दिल्लीच्या 'ऑल इंडिया इन्स्टिट्यूट ऑफ मेडिकल सायन्सेस' मध्ये हलवलं. उपचार सुरू झाले. उपराष्ट्रपती नि पंतप्रधान तिथे जाऊन त्यांची विचारपूस करून गेले.

दोन आठवडे सालिम अली जीवनमृत्यूच्या सीमारेषेवर वावरत होते. त्यानंतर त्यांची हळूहळू प्रकृती सावरली.

३० एप्रिलला त्यांना मुंबईत आणलं. आता त्यांना यॉट क्लबवर किंवा किहिमला ठेवणं धोक्याचं होतं. त्यांच्या आत्तेभावाकडे - अदनान फतेहअलींकडे - पाली हिलवर त्यांची सोय करण्यात आली.

दोन दिवस आराम केल्यावर सालिम अली चाकाच्या खुर्चीवरून बंगल्याच्या आवारात फिरू लागले. भोवतीच्या झाडांवर त्यांची मित्रमंडळी वाट पाहत होतीच... सालिम अलींनी डोळ्यांना दुर्बीण लावली. नजरभेट घेतली... काही नवीन आढळलं का पाहिलं... तेवढंच आपलं ज्ञान अद्ययावत.

दिल्लीहून परतल्यावर महिना दीड महिना बरा गेला. पण जूनच्या सुरुवातीपासून त्यांना पुन्हा त्रास होऊ लागला. चाकाच्या खुर्चीवरूनही हिंडणं-फिरणं बंद झालं. मुक्त वावरत आलेल्या या पक्ष्याला बिछान्यात पडून राहण्याची शिक्षा झाली.

डॉक्टरी इलाज सुरू झाले. डॉ. वाच्छांच्या प्रयत्नांना यश आलं. काही दिवसांनी सालिम अली चार पावलं चालू लागले. त्यांना डगमगत चालताना पाहून डॉक्टरांनी विचारलं, "मदत करू का काही?", "हो! एक मदत करा. तेवढं बिछान्यात अडकून पडणार नाही एवढं बघा!"

सालिम अलींना बरं वाटत नाहीए असं समजल्यावर त्यांना भेटायला येणाऱ्यांची रीघ सुरू झाली. मित्रमंडळी, सहकारी, विद्यार्थी, नोकरचाकर... पडल्या पडल्या ते साऱ्यांची चौकशी करत. प्रकाश गोळेंनी आणलेलं गुलाबाचं फूल किंवा उल्हास राणे यांनी आणलेल्या देवगड हापूसचं आवर्जून कौतुक करत.

त्यांच्या भेटीसाठी येणाऱ्या तरुणांना सांगत – 'अधिक वास्तववादी व्हा... विधायक व्हा. आयुष्यातल्या छोट्या छोट्या सुखांना पारखे होऊ नका. साध्यासाध्या गोष्टींतून मिळणारा आनंदही आयुष्याला खूप काही देऊन जातो.'

सोसायटीचे मानद सचिव डॉ. अशोक नानावटी आणि सालिम अलींच्या भावाचे पणतू शाहिद अली आता त्यांच्या बिछान्याशीच कायम असत.

दिवसा-दिवसाने, तासा-तासाने सालिमअली मृत्यूच्या समीप चालले होते. पण





त्यांची कोणती चलबिचल नव्हती की नाराजी नव्हती. 'मी समाधानी आहे. कृतार्थ आहे... माझ्यासारखं सुखी समृद्ध जीवन लाभलेले फार थोडे... आयुष्यातले चढउतार मी सारखेच तोलले. कारण परिस्थितीवर मीच स्वार झालो. लगाम माझ्या हाती ठेवला... म्हणूनच मी समाधानी आहे...'

जायची वेळ झाली तरी नेत्र पैलतीरी लागले नव्हते. १८ जूनला सकाळी त्यांनी शहीद अलीकडून एक पत्र लिहून घेतलं. गाय् माऊंडफोर्ड यांनी तेरा-चौदा वर्षांपूर्वी 'सो स्मॉल अ वर्ल्ड' हे निसर्गविषयक पुस्तक लिहिलं. सद्यपरिस्थितीशी संदर्भ जोडता यावा इतका तो विषय ताजा. जंगलतोडीचे भीषण दुष्परिणाम सांगणारा तो ग्रंथ. या ग्रंथावर आधारित चित्रपट बी.बी.सी. ने काढावा असं सूचित करण्यासाठी त्यांनी बी.बी.सी.च्या निसर्गअभ्यास विभागाला पाठवायचं पत्र तयार करून घेतलं.

संध्याकाळी सोसायटीचे काही सदस्य त्यांना भेटायला आले. पक्षि विज्ञान संशोधन केंद्राची उभारणी झालेली पाहायला मिळावी ही सालिम अलींची अतीव इच्छा. सरकारची अट मान्य करून तिच्या उभारणीला लागावं असा मनोदय त्यांनी बोलून दाखवला. क्षणाक्षणाने मृत्यूसमीप जात असतानाही वर्तमानाचे भान सुटलं नव्हतं. 'मृत्यूनंतर काय' याची त्यांना चिंता नव्हती. एक एक विचार, एक एक काम मार्गस्थ होतंय की नाही याचीच जाग घेत होते.

१८ जूनला रात्री त्यांना पक्षाघाताचा सौम्यसा झटका आला... डॉक्टरी इलाज चालू होतेच.

१९ जूनला पक्षिमित्र प्रकाश गोळे भेटीसाठी आले. नुकतेच ते चीनहून पक्षिविषयक परिषदेत सहभागी होऊन परतले होते. त्यांच्याकडे सालिम अलींनी परिषदेची चौकशी केली... नवं वर्तमान जाणून घेतलं.

रात्री नेहमीप्रमाणे डॉ. अशोक नानावटी आणि शाहिद अली सोबतीला आले.

सालिम अलींच्या पाठीत दुखू लागलं म्हणून बाम आणायला शाहिद रात्री साडेअकराच्या सुमारास आपल्या घरी गेला. त्याचं घर अदनान फतेहअलींच्या बंगल्यापासून जवळच काही अंतरावर असल्यानं घरी जाऊन येणं त्याला सोयीचं होतं.

सालिम अलींची अस्वस्थता वाढतच गेली. डॉ. नानावटी त्यांना आराम मिळावा म्हणून प्रयत्न करत होतेच... पण अस्वस्थता कमी होत नव्हती.

तास गेला.

शाहिद परत येऊन पाहातो तो डॉ. नानावटी सालिम अलींच्या शेजारी विमनस्क होऊन बसलेले.

...सालिम अलींचा प्राणपक्षी उडून गेलेला...

शाहिदला आठवलं यापूर्वी दोनदा, एकदा १९६८ साली नि दुसऱ्यांदा १९७४



साली, सालिम अली वारल्याच्या अफवा उठल्या होत्या. त्या वेळी दुखवट्याची पत्रं सोसायटीला आली तेव्हा 'आपण जिवंत आहोत' असं सालिम अलींनी स्वत:च्या हातांनी लिहून लोकांना पत्र पाठवली होती.

पण या वेळी ते खरंच गेले होते. आनंदयात्री अनंताच्या प्रवासाला गेला.

बेंजामिन फ्रँकलिन म्हणतो – मृत्यूनंतर तुम्हाला विस्मृत व्हायचं नसेल तर वाचण्यासारखं काही लिहा किंवा तुमच्यावर काही लिहावं असं करून दाखवा.

सालिम अलींनी दोन्ही केलं.







# परिशिष्ट १

## मानसन्मान

१९५३ – जयगोविंद लॉ मेडल, एशियाटिक सोसायटी - आशियातील प्राणिशास्त्रातील संशोधनाकरता

१९५८ – पद्मभूषण - भारत सरकारचा किताब, भारतीय पक्षिविज्ञानातील महनीय कामगिरीसाठी.

१९५८ – अलीगढ विद्यापीठाची सन्माननीय डॉक्टरेट

१९६७ – युनियन गोल्ड मेडल ऑफ ब्रिटिश ऑर्निथॉलॉजिस्टस् युनियन

१९६९ – जॉन सी. फिलिप्स् मेमो. मेडल - निसर्ग संरक्षणासाठी.

१९७० – सुंदरलाल व्होरा मेमो. मेडल - पक्षिविज्ञानविषयक संशोधनासाठी

१९७३ – दिल्ली विद्यापीठाची सन्मा. डॉक्टरेट

१९७३ – पॉवलोव्हस्की सेंटे. मेमो. मेडल (रशिया)

१९७३ – ऑफिसर इन द ऑर्डर ऑफ गोल्डन आर्क (नेदरलँड)

१९७६ – जे. पॉल गेट्टी इंटरनॅशनल प्राईझ फॉर वाईल्ड लाईफ कॉन्झर्वेशन (अमेरिका)

१९७६ – पद्मविभूषण (भारत) पक्षिविज्ञानातील संशोधनासाठी.

१९७६ – महाराष्ट्र अॅकेडेमी ऑफ सायन्सचे पहिले ऑन. फेलो.

१९७८ – आंध्र विद्यापीठाची सन्मा. डॉक्टरेट

१९७९ – सी.व्ही. रामन् मेडल.

१९८१ – एशियाटिक सोसा. ऑफ बांगला देश

१९८१ – रवींद्रनाथ टागोर मुद्रा, सुवर्णपदक - भारतीय उपखंडातील पक्षिशास्त्रातील खास कामगिरीबद्दल एशियाटिक सोसा. कलकत्ता

१९८२ – नॅशनल रिसर्च प्रोफेसरशिप इन ऑर्निथॉलॉजी (भारत सरकार)

१९८३ – इन्टरनॅशनल कॉन्झर्वेशन अवॉर्ड ऑफ नॅशनल वाईल्ड लाईफ फेड. (अमेरिका)

१९८३ – नॅशनल अवॉर्ड फॉर वाईल्ड लाईफ कॉन्झर्वेशन भारत सरकार

१९८५ – भारत सरकारतर्फे राज्यसभेवर नियुक्ती

१९८६ – कमांडर इन् द ऑर्डर ऑफ गोल्डन आर्क, नेदरलँड

१९८७ – दादाभाई नवरोजी प्राईझ (निसर्ग आणि वन्यप्राणी यांच्याविषयी प्रेम निर्माण केल्याबद्दल)





# परिशिष्ट २

## सालिम अलींचे कुटुंबीय

सालिम अलींच्या वडिलांचे नाव मोईझुद्दीन अब्दुलअली नि मातेचे नाव झीनत उन्निसा.

सालिम अलींना चार भाऊ - हमीद, हशम, अमीर नि जाबिर, चार भगिनी - अख्तर, अश्रफ, फरहात नि कमरुन्निसा.

सालिम अलींचे सर्व भाऊ सुशिक्षित नि सुविद्य. हमीद अली इंग्रज सरकारात मोठ्या हुद्द्यावर होते, मुंबई प्रांतात अनेक जिल्ह्यांवर जिल्हाधिकारी म्हणून त्यांची नेमणूक झाली होती. हशम अली हे हैदराबाद हायकोर्टाचे जज्ज होते. निजामच्या दरबारी 'नि:स्पृह न्यायाधीश' म्हणून मान्यता लाभली होती. अमीर अली तेव्हायमध्ये १०१९ साली अकाली वारले. जाबिर अली इंग्लंडहून कृषिशास्त्राची पदवी घेऊन परतलेले. कृषिशास्त्रात काही वेगळं करून दाखवण्याची त्यांची धडपड होती. ती सफल झाली नाही म्हणून ते ब्रह्मदेशी व्यापार करायला गेले. सालिम अलींसमवेत तेही तिथून कर्जाचा डोंगर घेऊन परतले. पुन्हा कृषिशास्त्रात रमले. हवं तसं काम करायला मिळाल्याचं समाधानही पुढे त्यांना लाभलं.

सालिम अलींच्या तीन बहिणींची – अश्रफ, अख्तर नि फरहात – लग्नं मामा अब्बास तय्यबजी यांच्या तीन मुलांशी झाली, तर कमरुन्निसाचं हसन अलींशी. कमरुन्निसाचे पुतणे हुमायून अब्दुलअली हे बालपणापासूनच सालिम अलींच्या वाटेने निघाले. आज ते मान्यवर पक्षिवेत्ते म्हणून ओळखले जातात. कमरुन्निसाचे पुत्र, साद अली 'बॉम्बे इन्विरनमेंट ॲक्शन ग्रुप' (BEAG) चे सक्रिय कार्यकर्ते आहेत. त्यांचे पुत्र डॉ. रैफ हे पर्यावरणतज्ज्ञ म्हणून पाँडेचरीत काम पाहतात. कमरुन्निसाची कन्या लईक हिलाही पक्षिशास्त्रात रस. सालिम अलींच्या 'कॉमन बर्ड्स' या पुस्तकाची ती सहलेखिका. तिचे पती झफर फतेह अली. हेही पक्षितज्ज्ञच. त्यांची कन्या झाई नि जामात रामू व्हिटॅकर हेही प्राणिशास्त्राच्या अभ्यासात नावलौकिक मिळवून आहेत.

जाबिर भाईचे पुत्र अमीर अली हॉर्टिकल्चरिस्ट आहेत. तर नातू बदर प्राणिशास्त्रात बी.एससी. करतोय.

हशम अलींचा पणतू शाहिद अली हा डॉक्टरेट मिळविण्यात गुंतलाय.

सालिम अलींनी आपल्या कुटुंबीयांत प्राणिमैत्री चांगलीच रुजवलीय हे खरं.







# संदर्भ


- The fall of a sparrow : — Salim Ali
- A Bundle of feathers : — Ed. Dr. Riply
- Handbook of the birds of India and Pakistan (Introduction) : — Salim Ali
- Birds of Kerala (Intro) : — Salim Ali
- Auk - April 1979
- Auk - April 1987
- Ibis - Oct. 1956
- Ibis - Jan. 1970
- Indian Magazine - — Feb. 1982
- Indian Magazine - — Aug. 1987
- Span April 1976
- Science Today — Mar. 1974
- Several Issues of BNHS Journal Hornbill
- Telegraph Colour Magazine — May 1987
- जंगलाचं देणं — मारुती चित्तमपल्ली
- द्विजगण अवघे वृक्षी — मारुती चित्तमपल्ली
- चक्रवाक देशी — प्रकाश गोळे
- भारतीय पक्षी (मराठी अनु.) — सालिम अली
- किर्लोस्कर — मे १९७५
- लोकराज्य — जुलै १९८७
- अभिजात (दिवाळी अंक) — १९८७
- मराठी विज्ञान पत्रिका — ऑगस्ट १९८७
- केसरी (दिवाळी अंक) — १९८७
- ध्वनिमुद्रित मुलाखत — प्रकाश गोळे यांच्या संग्रहातून



- दूरदर्शनवरील मुलाखतीच्या दोन चित्रफिती
  1) Down the memory lane
  2) Black crane Expedition
  
  एस.ए. हुसेन यांच्या संग्रहातून
- फिल्म्स डिव्हिजनची 'In Company of Birds' ही फिल्म. (श्री. प्रभाकर पेंढारकर यांच्या सौजन्याने)
- लोक वान थो यांच्या अप्रकाशित रोजनिश्या BNHS Library च्या सौजन्याने
- सालिम अलींवरील विविध कात्रणे
  - BNHS ग्रंथालय
  - Times of India चे ग्रंथालय
  - मुंबई मराठी ग्रंथालय (नायगाव) मुंबई.

* आवाहनास प्रतिसाद

सादा अली, अमीर अली, झीनत फतेहअली, पु.ल. देशपांडे, ॲडमिरल आवटी, राईलकर, प्रवीण काटवी, सलील घोष, आर.एम. राहूरकर, मुकुंद डोळे, एकनाथ पाटील, सुरेश कुमठेकर आणि दादाभाई नवरोजी ट्रस्ट यांनी पाठविलेली कात्रणे / स्मरणे.

